 Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –




वर्ष २८

अंक अकरावा

ऑगस्ट १९७५

रु. १-२५


अनुक्रमणिका



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशालामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठ्ठाविसावे
अंक अकरावा

# नवभारत

ऑगष्ट १९७५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशालामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

१. संपादकीय :– कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२. व्यवस्थापकीय :– व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

श्री. य. चिं. देवधर

# आल्फ्रेड मार्शल आणि सहकारी मार्ग*

इंग्रजी अर्थशास्त्रातील मूळ विचारांचा नवोन्मेषाने पुरस्कार करीत असतानाच त्यांची नवी संगती लावणारे प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ आल्फ्रेड मार्शल ( १८४२–१९२४ ) यांना इंग्लंडमधील तत्कालीन सहकारी पुढाऱ्यांत अधिकृत असे स्थान नव्हतेच. असे असूनसुद्धा सहकारी तत्वप्रणाली आणि व्यवस्था यासंबंधी मार्शल यांनी केलेल्या विवेचनाकडे काणाडोळा करणे कोणाही अर्थ-शास्त्रज्ञाला वा सहकारी पुढाऱ्याला न शोभणारे व अवघड ठरेल. सहकारी मार्गाबद्दल मार्शल यांनी केलेल्या विवेचनाचे मुख्य वैशिष्टच असे की ते त्यांच्या अर्थशास्त्रीय विचारांचे व विश्लेषण पद्धतीचे अविभाज्य लक्षणच आहे. अतिशयोक्तीचा धोका सहज टाळून असे म्हणता येईल की मानवाच्या भौतिक स्वास्थ्याकडे पाहावयाचा मार्शल यांचा दृष्टिकोन पूर्णपणे समजावून घ्याव-याचा असेल तर प्रत्येक मानवातील सहजोत्स्फूर्त सहकारी प्रवृत्ती व त्या प्रवृत्तीतील अर्थ व्यवहारोपयोगी प्रचंड शक्ती याचे मार्शल यांनी केलेले विवे-चन समजावून घेणे प्रत्येक अर्थशास्त्रज्ञाला भाग पडेल. तद्वतच भौतिक व्यव-हारात सातत्याने व धैर्याने सहकारी तत्वांचा व मार्गाचाच अवलंब का करा-वयाचा हे सहकारी मार्गस्थाला जर जाणून घ्यावयाचे असेल तर आर्थिक व्यवहारामागे मानवी मनातील अनेकविध हेतूंचे मार्शल यांनी केलेले परीक्षण पचनी पाडणे त्याला अत्यावश्यक ठरेल.

## १. अर्थशास्त्राकडे पाहाण्याच्या दृष्टिकोन

"अर्थशास्त्राची मूलतत्त्वे ( Principles of Economics ) या त्यांच्या ग्रंथात मार्शल आपला अर्थशास्त्राकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्पष्टपणे मांडतात. शुष्क अर्थशास्त्रीय उपपत्ती व ठराविक साच्याच्या गृहीत तत्वांवर

* मूळ संशोधनपर लेखाचे वरील लेख हे स्वैर रूपांतर आहे. पाहा. Y. C. Devadhar, Alfred Marshall on cooperation, Annals of Public and Cooperative Economy, Vol. 42, No. 4, October–December 1971 (Liege) Belgium ( pp. 285–301 ).



अनुक्रमणिका






आधारित तर्कसंगती अर्थशास्त्रात मार्शल यांनी गौण मानल्या. म्हणूनच मूळ विवेचनातून त्याना शक्यतो दूर करून त्यांचा प्रपंच त्यानी ग्रंथाच्या अंत्य परिशिष्टात मांडला. तोही मूलग्राही व वाचनीय आहे. मार्शल यानी आपले लक्ष मानवाच्या भौतिक स्वास्थ्यावर केंद्रित करून व ते स्वास्थ्य ज्या सामाजिक व आर्थिक प्रक्रियांचा परिपाक म्हणून मानता येईल त्यांचे विवेचन मुख्यत: केले. समाजाच्या आर्थिक व्यवहारांचा सर्वंकष विचार करण्याचे कामी निव्वळ गृहीत तत्वाधारित तर्कसंगती, ( कितीही अचूक असली तरी ), तोकडीच पडते असेच मार्शल मानीत होते. आर्थिक सत्यान्वेषण सविस्तर व अचूक झाल्यावरच त्यासंबंधी गृहीत तत्त्वे व तन्निर्मित तर्कसंगती सत्यस्पर्शी होतात हे ते जाणून होते. त्या सत्यान्वेषणात जोपर्यंत मानवाच्या उच्चस्तरीय भौतिक स्वास्थ्याचे यथातथ्य अवलोकन होत नाही तोपर्यंत अर्थशास्त्रीय तर्कसंगती तोकडीच पडणार असे ते मानीत असत. त्यांच्या मते अर्थशास्त्रातील मूळ प्रश्न हाच की, प्रत्येक व्यक्तीला दारिद्र्याच्या अंकुशातून मुक्त झालेले व पूर्ण विकसित असे समृद्ध सांस्कृतिक जीवन कसे जगता येईल. या प्रश्नाचे पूर्णउत्तर फक्त काही अंशीच अर्थशास्त्रात सापडेल असे ठाम मत त्यांनी मांडले. कारण फारच अधिक अंशाने तें उत्तर शोधण्यासाठी कोणालाही मानवी स्वभावाच्या नैतिक व सामाजिक क्षमतेची कास धरावी लागते. म्हणूनच " भौतिक संपत्तीच्या आय–व्यय-समुच्चयाचे शास्त्र " अशी अर्थशास्त्राची व्याख्या न करता ते शास्त्र " मानवाच्या समष्टिरूपाच्या सर्वंकश अभ्यासातील एक भाग आहे " असें मार्शल यांनी प्रतिपादले. किंबहुना संकुचित व्याप्तीच्या अर्थशास्त्राची व्याख्या त्यांनी अशी केली की, अर्थशास्त्र म्हणजे निव्वळ मानवाच्या भौतिक जीवनातील गद्य* आर्थिक व्यवहाराचे शास्त्र " होय. या व्याख्येवरून हाच निष्कर्ष निघतो की, मानवी जीवनाचे दोन भागापैकी एक नीतितत्वांनी अस्पर्शित केलेला भौतिक व्यवहार आणि दुसरा भाग नीतितत्त्वाधीन उच्चस्तरीय भौतिक स्वास्थ्य असे मार्शल यांना अध्याहृत होते. इतकेच काय तर यांतील दुसरा भाग ते जास्त महत्वाचा व श्रेष्ठ दर्जाचा मानीत होते असाही निष्कर्ष निघतो. या निष्कर्षांना पुष्टी देणारा पुरावा पुढील विवेचनात येईलच.

आधुनिक औद्योगिक समाजाची मुख्य व्यवच्छेदक लक्षणे मार्शल यांनी कोणती मानली हे पाहाणे जरुर आहे. ते म्हणतात की, क्रय–विक्रय–वायदे

* मुळात ' Ordinary business of life ' असा शब्दप्रयोग आहे.

करतांना व्यक्तीव्यक्तीमध्ये जी स्पर्धा व अहमहमिका दिसून येते ती औद्योगिक समाजाचे मूलभूत लक्षण नसून त्या समाजाच्या तीन प्रमुख व व्यवच्छेदक लक्षणांचा गौण आणि अचानक घडणारा परिणाम आहे. ही तीन लक्षणे कोणती? पहिले म्हणजे सदैव स्वावलंबी राहण्याची व्यक्तीची संवय, दुसरे लक्षण सारासार विचार करून निमिषार्धात निर्णयाला पोहोचण्याची क्षमता, आणि तिसरे असे की भविष्यकालीन साध्यांवर लक्ष ठेवून त्या दिशेने दूरदृष्टी ठेवून पाऊले टाकण्याची पद्धत. ही संवय, ही क्षमता व ही पद्धत आधुनिक औद्योगिक समाजातील बहुतांशी व्यक्तींच्या अंगवळणी पडलेली असते व त्यांचा कल जितका खुल्या स्पर्धेकडे झुकतो तितकाच सहकारी आणि सामूहिक भागीदारी पद्धतींकडे वळतो. हे करण्यास प्रत्येकजण सारखाच स्वतंत्र असतो. कोणत्याही पद्धतीने व्यवहार व कार्य करण्याच्या स्वातंत्र्याची कक्षा करार स्वातंत्र्याच्या वाढीबरोबरच वाढते: कारण आधुनिक औद्योगिक समाजात पारंपरिक मूल्यांच्या आणि कार्यपद्धतीच्या शृंखला गळून पडत असतात. किंबहुना असे होत राहाणे त्या समाजाच्या आधुनिकतेचे आवश्यक लक्षणच आहे असे मार्शल यांचे मत होते. 'खुली वा मुक्त स्पर्धा' या शब्दाऐवजी "औद्योगिक स्वातंत्र्य" वा "आर्थिक स्वातंत्र्य" असा साधा शब्दप्रयोग करूनच मार्शल आधुनिक औद्योगिक समाजाच्या मुख्य लक्षणाचे वर्णन करीत. कारण त्यांना विचारार्ह वाटणारा मूळ प्रश्न हा होता की, कोणत्याही समाजात व्यक्तिस्वातंत्र्याचे खंडन होते किंवा कसे, आणि जर होत असेल तर ते किती व कोणत्या प्रकारे होते, मग व्यवहारपद्धत स्पर्धेची असो, सहकारी असो, भागिदारीची असो, नाहीतर आणखी कशीही असो. खोटेपणा, लाचलुचपत व भेसळ करणे ही खुल्या स्पर्धेची कुलक्षणे होत. आधुनिक समाजात घाऊक पद्धतीनें उत्पादन, वितरण व सेवन होत असल्यानें या कुलक्षणाचे थैमान वाढतच जाते व त्या थैमानाचे दुष्परिणाम तीव्र होतात हे मार्शल पूर्णपणे जाणून होते. तरीसुद्धा खुल्या स्पर्धेच्या तत्वाला व व्यवहाराला त्यांनी निव्वळ त्याज्य अरिष्ट म्हणून संबोधले नाही व तसे करण्यापूर्वी पुरेसे संशोधन व चिकित्सा झाली पाहिजे असें आग्रहाने सांगितले. मार्शल ह्यांचे म्हणणे असे होते की, आधुनिक समाजाला निव्वळ स्वार्थ हा विघातक ठरत नसून सहेतुक स्वार्थीपणा हा मात्र विघातक ठरतो. अशाही समाजामध्यें अर्थ व्यवहारामागील उत्स्फूर्तपणा आणि जोम टिकविण्यासाठीं खुल्या स्पर्धेची जरूरी असतेच. तत्कालीन इंग्रजी समाजातील उदाहरण देताना त्यांनी असे सांगितले की, "खुली स्पर्धा किंवा औद्योगिक स्वातंत्र्य हे मोकाट सोडलेल्या अक्राळविक्राळ राक्षसाप्रमाणे

समाजात बेमान चालीत होते. आर्थिक स्वातंत्र्याच्या नवलाईनें धुंद होऊन बेजबाबदार व्यापारी समाज आपल्या नवशक्तीचा गैरवापर करून सर्व व्यवहारात समाजघात करीत होते." असे असूनसुद्धा, खुल्या स्पर्धेला लगाम घालणे हे अंतिम परिणामी समाजाला विघातक ठरण्याची शक्यता आहे असेच मार्शल ह्यांचे मत पडले. त्यांचे म्हणणे असे की खुल्या स्पर्धेवर नियंत्रण घालावयाचे असेल तर त्या नियंत्रणाचे दुष्परिणाम खुल्या स्पर्धेच्या दुष्परिणामांहून जास्त असता कामा नयेत.

ह्याचा अर्थ असा घ्यावयाचा काय की प्रचंड मक्तेदारी व भागीदारी करणाऱ्या संस्थांची व प्रवृत्तींची सदैव जननी ठरणारी खुळी स्पर्धाच त्यांना मान्य होती? का सहकारी तत्वावर अर्थरचना व धोरण हे ते जास्त पसंत करीत होते? ह्या प्रश्नांची उत्तरे शोधावयाची असल्यास मार्शल ह्यांनी केलेल्या मानवी हेतूंच्या मूलग्राही विवेचनाकडे जावे लागते. ह्या विवेचनात त्यांनी मानवी हेतूंचे सामाजिक व आर्थिक दर्शन घडवून त्या परस्पर विरुद्ध सहज-प्रवृत्ति एकत्र गुंफून, जास्तीत जास्त कार्यक्षमपणे अर्थव्यवस्था उभारून समाजाचे जास्तीत जास्त व व्यवहार्य कल्याण कसे साधता येईल हे दाखवून दिले आहे. ह्या प्रश्नांच्या उत्तरांवरून असेही दिसून येते की, खुली स्पर्धा श्रेष्ठ की सहकारी मार्ग श्रेष्ठ ह्या मूळ प्रश्नाचेच महत्त्व मार्शल ह्यांना वाटले नव्हते. ह्याचे कारण असे की, प्रत्येक व्यक्तीची मनोधारणा ज्या दोन प्रभावांनी घडते त्याची अचूक कल्पना मार्शल ह्यांना होती. हे दोन प्रभाव धार्मिक व आर्थिक स्वरूपाचे आहेत. पहिला दुसऱ्यापेक्षा जास्त तीव्र आणि कमी व्याप्तीचा असतो. मार्शल ह्यांनी असे प्रतिपादिले की आधुनिक समाजात जसजशी लोकशाहीच्या मूल्यांची वाढ होते तसतशी दुसऱ्यांबद्दल सहानुभूति वाढत जाऊन त्यातूनच निर्व्याज निस्वार्थीपणाचा उगम होतो. हे असे सतत व एवढ्या मोठ्या प्रमाणावर होत असते की, जेव्हा जेव्हा निःस्वार्थी व कार्यनिमग्न पुढारीपण लाभते तेव्हा तेव्हा, उत्स्फूर्त व जोमदार मदत आणि पुरस्कार असंख्य लोकांकडून त्या पुढाऱ्यांना मिळत राहतात. उदाहरणादाखल तत्कालीन इंग्लंडमधील धर्मदायी संस्थांनी केलेले दिव्य कार्य आणि सेंट सायमन्स, फूरिये व ब्लॉ इत्यादींनी सर्वप्रथम केलेले समाजवादाचे प्रयोग ह्यांचा निर्देश त्यांनी केला.

मार्शल ह्यांची पुरेपूर खात्री होती की सहेतूक स्वार्थीपणाबरोबरच समाजात सहेतूक निस्वार्थीपणाही असतो. पहिला सहज ओळखू येतो, तर दुसरा सहज ओळखू येत नाही, इतकाच फरक. अशा सहेतूक निस्वार्थीपणाच्या भरभक्कम पायावर आर्थिक व्यवहाराची उभारणी करून फार मोठ्या प्रमाणावर आणि

ज्यास्त जास्त समाज-कल्याण साधणे शक्य असल्याकारणाने तसे करण्याबद्दल त्यांनी सर्व अर्थशास्त्रज्ञांना आदेश दिला. अर्थशास्त्रज्ञांनी समाजात कोणती भूमिका व कार्य पत्करावीत यावर मार्शल ह्यांनी थोडक्यात असे म्हटले आहे. "ह्यात काहीच शंका नाही की. आजसुद्धा प्रत्यक्षात निःस्वार्थी सेवा ज्या प्रमाणात व्यक्ति नेहमी करीत आलेल्या आहेत त्यापेक्षा कितीतरी पटीने जास्त ती सेवा त्यांचे हातून घडू शकेल. म्हणून. अर्थशास्त्रज्ञाचे अत्यंत श्रेष्ठ कार्य हेच की, प्रथम त्या निःस्वार्थीपणे सेवा करण्याच्या प्रवृत्तींचा शोध करणे आणि मग सूज्ञपणे त्या प्रवृत्तींचा जास्तींत जास्त विधायक उपयोग करून घेणे." या ठिकाणी हे स्पष्ट दिसून येते की, मार्शल यानी मनुष्यस्वभावाची पूर्ण परीक्षा करून तात्विक दृष्टचा काहीएक निश्चित अटकळ बांधली होती. मनुष्यस्वभाव कसा आहे या मूलभूत प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी त्याचे मनात सुष्ट-दुष्ट प्रवृत्तींचा सतत संघर्ष चालू असतो या मान्यवर तत्त्वावर त्यांनी भर दिला. मग असे प्रतिपादले की, मनुष्य हा संपूर्णपणे स्वार्थीही नाही आणि संपूर्णपणे विचारशीलतेच्या प्रभावाखाली राहून सतत सामोपचाराने व्यवहार करीत नाही. (या ठिकाणी आठवण होते ती हॉब्स व लॉक यांची. पहिल्याने मनुष्याचे 'एकाकी, निकृष्ट, भांडकुदळ, निर्दय आणि तोकडा' म्हणून वर्णन केलेले आहे, तर दुसऱ्याने "भूतलावरील विचारशील सज्जन" असे त्यास संबोधले आहे.) इतर उदारमतवादी इंग्रजी तत्ववेत्यांप्रमाणे मार्शल यांनी मनुष्यस्वभाव परस्परविरुद्ध व गुंतागुंतीच्या प्रवृत्तींनी बनलेला आहे असेच मानले. अर्थशास्त्रज्ञ म्हणून मार्शल यांचेपुढे हाच एक प्रश्न उपस्थित होता की सामाजिक संस्थांची जडण-घडण कशा पद्धतीने करावी की जेणेकरून या मानवी परस्परप्रवृत्ती सीमित करून, सम्मीलित करून त्यांचा ओघ व शक्ती पद्धतशीरपणे व सर्वमान्य मार्गाने समाजाचे शक्यतोवर जास्तीत जास्त आर्थिक कल्याण साधण्याकडे वळविता येईल. हे करीत असताना अर्थातच मनुष्य स्वभावाविरुद्ध सामाजिक संस्था निर्माण न करणे हेच श्रेयस्कर असे मार्शल यांनी मानले. असो. मार्शल यांची ही तात्विक भूमिका समजावून घेतल्यावर त्यांचे मते सहेतुक स्वार्थीपणा व निःस्वार्थीपणा या दोन परस्परविरुद्ध प्रवृत्ती प्रत्येक व्यक्तीच्या आर्थिक व्यवहारात का त्याना दिसून येतात, हे कोडे सहज उलगडते. तसेच असा मनुष्यस्वभाव स्पर्धा, भागीदारी आणि सहकार या तीनही व्यवहारपद्धतींकडे का आकर्षिला जातो हेही समजते.

व्यवहारी दृष्टीने मुख्य प्रश्न असा की या दोन परस्पर विरुद्ध मनःप्रवृत्तीत वरचष्मा कोणत्या प्रवृत्तीचा होतो व टिकून राहतो. या प्रश्नाचे मार्शल

यांचे उत्तर स्पष्ट आहे. ते लिहितात, की भांडवलशाही व्यवस्थेत सहेतुक स्वार्थी प्रवृत्ती सर्वप्रकारच्या निःस्वार्थी प्रवृत्तींवर मात करताना दिसतात आणि म्हणूनच भांडवलशाही समाजात त्या सहेतुक स्वार्थी प्रवृत्तींचे बळ व कार्यक्षेत्र मर्यादित ठेवण्याचे कार्य व जबाबदारी सहकारी संस्थांवर येऊन पडते. त्यांच्याच शब्दात सांगावयाचे तर :–

" मानवाच्या प्रगतीसाठी आवश्यकच नव्हे तर अत्यावश्यक असणाऱ्या गरजांमध्ये आशा आणि महत्वाकांक्षा, तसेच खुल्या स्पर्धेचा अंकुश यांचा समावेश करावाच लागेल. परंतु माझ्या मते आज सहकाराला ज्या सामाजिक दुष्ट शक्तींशी टक्कर द्यावयाची आहे ती ही की, ज्या आशांनी आणि महत्वाकांक्षांनी मनुष्य कार्यप्रवृत्त होतो त्यामधे निःस्वार्थीपणापेक्षा कितीतरी पटीने जास्त स्वार्थीपणा आढळतो."

आतापर्यंतच्या विवेचनावरून निघालेल्या चार निर्णयांचा संक्षिप्त उल्लेख करून आपल्याला पुढील चर्चा–विषयाकडे जाता येईल. प्रथम असे दिसले की मार्शल हे कार्यप्रवृत्ती बाळगणारे व निव्वळ विचारमंथनात गुरफटून न राहाणारे श्रेष्ठ अर्थशास्त्रज्ञ होते. त्यांच्या मनाने हाच ध्यास घेतला होता की आर्थिक व्यवस्थापनाच्या धोरणाने सर्वांचे भौतिक जीवनमान कसे उंचावता येईल व विशेषतः दीनदुबळ्या बहुसंख्यांकाचे त्यांच्या आर्थिक प्रश्नांच्या चिकित्सेचे हेच मुख्य लक्ष्य होते. तसे करीत असताना अर्थातच मनुष्याच्या उच्चस्तरीय भौतिक कल्याणाला कोणत्याही प्रकारे बाधा होणार नाही याची ते काळजी वहात होते. दुसरे असे दिसले की साचेबंद अर्थशास्त्राच्या मर्यादित कक्षा मार्शल ओळखून होते व म्हणूनच आर्थिक प्रश्नांचे व त्यावरील व्यावहारिक तोडग्यांचे नैतिक व सामाजिक मूल्यमापन होणे जरूर आहे असा त्यांचा आग्रह होता. तिसरे असे की, सहकारी, भागीदारी की स्पर्धेबाजी पद्धतीने आर्थिक व्यवहारांची जुळवणी करायची याबद्दल मार्शल यांनी लवचिक पण व्यवहारी भूमिका घेतली होती. कारण कोणत्याही प्रकारच्या जुळवणीत व्यक्तिस्वातंत्र्याच्या कक्षा किती विस्तीर्ण रहातात व रहाव्यात याकडे मार्शल विशेष लक्ष देऊन पहात होते. सरतेशेवटी, पण प्रस्तुत विवेचनासाठी फार महत्वाचा निर्णय असा की मार्शल यांचे ठाम मत होते की सहेतुक निःस्वार्थीपणात जास्त समाजकल्याण साधण्याची शक्ती असूनसुद्धा तिचा योग्य वापर न झाल्याने तिचा व्यय होतो आणि असे होण्याचे एक मुख्य कारण हेच की सहेतुक स्वार्थीपणा समाजातील आविष्कार फार उघड आणि उग्र स्वरूपाचा असतो. इतका की तोच सर्वव्यापी

असून समाजात निःस्वार्थीपणाला वावच नाही किंबहुना अस्तित्वसुद्धा नाही, अशी साधारण समजूत होऊन बसते, असे होऊ देऊ नये असे मार्शल आग्रहाने बजावीत होते.

## २. सहकारी तत्त्वप्रणाली आणि मार्शल यांचे विचार

हे पुनश्च आवर्जून सांगितले पाहिजे की अर्थव्यवहारांची जुळवणी कोणत्या तत्वावर आधारावी याबद्दल मार्शल यांनी कोणतीही आग्रही भूमिका न घेतल्याने सहकारी तत्वप्रणालीकडे ते स्थितप्रज्ञाच्या भूमिकेतून पाहू शकले. सहकारी वा स्पर्धाधिष्ठित अर्थव्यवहाराची जुळवणी असो, त्या दोहोकडे समदृष्टीने पाहात असता मार्शल हेच काळजीपूर्वक अजमावत होते की कोणत्या जुळवणीत व्यक्तिस्वातंत्र्य अधिक व कोणत्यात कमी उपलब्ध होते व ते झाले तर कितीप्रमाणांत. या एकाच कसोटीवर वेगवेगळ्या प्रकारच्या अर्थव्यवहारांच्या जुळवणींचा विचार करीत असल्याने एक त्याज्य मानून दुसरी जुळवणी मार्शल पसंत करीत होते असे म्हणणे चूक ठरेल. कोणतीही जुळवणी असो, तिचे गुणदोषासकट समतोल मूल्यमापन त्यांनी कसे केले याचे पुढील उदाहरण काळजीपूर्वक विचार करण्याजोगे आहे. ते लिहितात —

> " समाजकल्याण साधण्याचे भिन्न मार्ग या दृष्टीने आपण जर खुली स्पर्धा व निःस्वार्थी कार्यातील जोमदार सहकार यांची तुलना करू लागलो तर असे दिसेल की उत्तमांत उत्तम अशी स्पर्धा-तत्वावर आधारलेली अर्थव्यवहाराची जुळवणी ही तुलनेने निकृष्ट व त्याज्य वाटेल; मग स्पर्धाधारित इतर गौण व कठोर व्यवहाराच्या जुळवणीचा विचारच सोडून द्या. "

— दुसरे असे सांगितले पाहिजे की सर्व प्रकारच्या आर्थिक जुळवणींकडे समदृष्टीने पाहाण्यात मार्शल यांचा हेतू हाच होता की त्या सर्व प्रकारांची एकत्र गुंफण जास्तीत जास्त समाजकल्याणकारी करता येईल व तसे करून प्रत्येक आर्थिक घटकाला कोणत्याही प्रकारच्या जुळवणीची स्वेच्छेने निवड करण्याचे स्वातंत्र्य देता येईल.

मार्शल यांचा हा तटस्थपणा त्यांच्या विचारप्रणालीतील औदार्याचे दर्शन घडवतो. हा तटस्थपणा आधुनिक अर्थशास्त्राच्या नीतिनिरपेक्ष तटस्थपणापेक्षा वरच्या दर्जाचा मानावा लागेल. नीति—अनीतीचा विचार प्रत्येक आर्थिक घटक आधीच करून ठेवतो म्हणून तो विचारबाह्य असे आधुनिक अर्थशास्त्र मानते. किंबहुना त्या शास्त्राची व्याख्याच अशी केली आहे की निव्वळ आर्थिक

स्वरूपाच्या पर्यायाची निवड करण्याचे प्रश्नच त्याच्या कक्षेत बसावेत. मार्शल यांना अर्थशास्त्राची व्याख्या व विषयक्षेत्र असे संकुचित करणे मान्य नव्हते. कारण त्यांची खात्री होती की तसे केल्यास अर्थशास्त्राचे स्वरूप कृत्रिम होईल व त्याचे निर्णय व मार्गदर्शन तोकडे व दिशाभूल करणारे म्हणून धोक्याचे ठरतील. शिवाय मनुष्याच्या उच्चस्तरीय भौतिक स्वास्थ्याचे मार्शल यांना अत्यंत महत्वाचे वाटणारे प्रश्न वगळले गेल्यामुळे अर्थशास्त्राच्या आधुनिक व्याख्येत अल्पव्याप्तीचा दोष येतो. मार्शल व इतर कल्याणकारी अर्थशास्त्रज्ञांचा हाच विशेष आहे की ते मनुष्याच्या उच्चस्तरीय भौतिक स्वास्थ्याची प्राप्ती व जपणूक करण्यासाठी वचनबद्ध राहिले. संपूर्ण भौतिक जीवन ते विचारात घेत व मनुष्याच्या सुप्त शक्तींचा विकास घडवून आणणे हेच त्यांच्या अर्थशास्त्राचे ध्येयसूत्र होते.

या भूमिकेला अनुसरूनच सहकारी तत्वप्रणालीत जेथे व्यक्तिविकास, स्वयंपूर्णतेची संवय व भव्यदिव्य समाजकल्याण साधण्यासाठी लागणारी सहेतुक निःस्वार्थीपणे सामाजिक कार्य करण्याची तयारी या गुणांवर भर दिला आहे, तेथेच नेमके बोट ठेवून मार्शल यांनी इतर सामाजिक व आर्थिक विचार-प्रणालीत ही वैशिष्टये अजिबात किंवा इतक्या प्रमाणात आढळत नाहीत असे पुनः पुन्हा आग्रहाने सांगितले. त्यांनी सहकाराची एकमेवाद्वितीय अशी लक्षणे सांगण्यासाठी असे लिहिले, "सहकारात उच्च ध्येये व पराकोटीचे परिश्रम या दोहोंची गरज असते. कारण प्रत्येक व्यक्तीच्या उत्स्फूर्त शक्तींचा विकास घडवून आणून, सार्वजनिक साधनसामग्रीचा वापर करून सार्वजनिक कार्य करून सार्वजनिक कल्याण साधण्याचे तिला शिक्षण द्यावयाचे असते व्यक्तीच्या सुप्त शक्तीचाच विकास घडविण्याचे एकमेव ध्येय पुढे ठेवल्यामुळे सहकारी कार्यकर्त्यांला धीरगंभीरपणे व शहाणपणाने कार्य करावे लागते" अर्थशास्त्राचा निव्वळ अभ्यासक व शिक्षक या भूमिकेतूनसुद्धा मार्शल यांना सहकारी अर्थव्यवस्थेत "विकासाची बीजे" दिसली. कारण त्यांचे मते चांगल्या सहकारी चळवळीमध्ये कामकरी वर्गातले लोकाना आर्थिक व्यवस्थापनाचे कसब शिकण्यास संधि दिली जाते व समाजकल्याण साधण्यासाठी एकोप्याने सार्व-जनिक कार्य करण्याचे शिक्षण दिले जाते. सहकारावर ज्याप्रमाणे त्यांचा दृढ विश्वास होता, त्याचप्रमाणे साध्या लोकांमध्ये सुद्धा भव्यदिव्य समाजकार्य करण्याची विशेष क्षमता नेहमीच असते अशी मार्शल ग्वाही देत होते. परंतु त्या विशेष क्षमतेचा योग्य उपयोग न झाल्याने ते लयास जाते असे त्यांनी प्रतिपादले. म्हणूनच या प्रचंड प्रमाणात लयास जाणाऱ्या विशेष क्षमतेचा

योग्य उपयोग सहकारी संस्थांनी करून घ्यावा, त्यामुळे सहकारीसंस्थांच्या उज्ज्वल भवितव्याचा पाया बळकट होईल एवढेच नव्हे तर तसे करण्याची सर्वाधिक योग्यता सहकारी संस्थांमध्येच सापडते असे त्यांनी प्रतिपादले. त्यांचे मते सामान्य कामकरी वर्गाला जास्त जास्त जबाबदारीची व्यवस्थापनात कामे देऊन त्यांच्या भव्यदिव्य समाजकार्य करण्याच्या विशेष क्षमतेचे चीज सहकारी संस्थाच उत्तम रीतीने करू शकतात.

समाजात व्यक्तीला धनाढ्यता व उच्च स्थान अल्पकाळात प्राप्त होण्याऐवजी ते क्रमाक्रमाने व धीमेपणे प्राप्त होणे केव्हाही श्रेयस्कर आहे असे मार्शल मानीत. एकाएकी धनाढ्य बनणे त्या व्यक्तीच्या नैतिक आचरणास धोका निर्माण करते. एवढेच नव्हे तर त्याच्या मुलाबाळांवर त्याचे जास्त दुष्ट परिणाम होतात. असे झाल्यास सामाजिक संबंध तणावत व दुरावत जाऊन त्यातील सामाजिक श्रेय हरपते व त्याची जागा अनुत्पादक व घातक सामाजिक संबंध घेतात. सहकारी कार्यपद्धतीत मार्शल यांना फार मोठे श्रेय दिसले याचे कारण त्या पद्धतीत प्रत्येक व्यक्तीला समृद्धीचा मार्ग खुला राहतो व त्या मार्गावर धीमेपणाने प्रगति करीत असतानाच जास्त जास्त श्रेयस्कर वा उत्पादक ठरणाऱ्या कार्यपद्धतींच्या कल्पना सुचविण्याची प्रत्येकाला संधी उपलब्ध राहू शकते. अर्थात् सर्व कामकरी वर्गाला अशातऱ्हेने स्वसमृद्धीच्या मार्गावर प्रगति साधण्यासाठी तीन प्रमुख गोष्टींची गरज असते. एकतर उत्तम कार्य करण्याचे शिक्षण त्यापैकी प्रत्येकाला मिळाले पाहिजे. दुसरी गोष्ट ही की उत्तम कार्य करण्याची प्रत्येकाला संधी मिळाली पाहिजे, आणि शेवटची पण तितकीच महत्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येकाला दिलेल्या संधीचा फायदा घेण्यास प्रवृत्त करण्यासाठी महत्वाकांक्षेच्या मधाचे बोट त्या संधीलाच लावावे लागते. या तिहेरी पद्धतीने कामकरी वर्गाला कार्यक्षम व उत्पादक बनविण्याचे जास्तीत जास्त सामर्थ्य सहकारी चळवळीतच का आढळते याचे विवेचन मार्शल यांनी खालीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात,

"कामकरीवर्गाच्या उपरीनिर्दिष्ट तीन गरजा भागविण्याची क्षमता वेगवेगळ्या प्रमाणात असणाऱ्या सामाजिक संस्था आहेत, नाहीत असे नाही. परंतु प्रत्येकीच्या कार्यपद्धती आक्षेपार्ह असल्याने विचारार्ह वाटत नाहीत. याला अपवाद एकच. आणि तो म्हणजे सहकारी कार्यपद्धतीचा. इतर प्रकाराच्या सामाजिक संस्थांची ध्येये उच्च नाहीत असे नाही किंवा त्यांच्या आर्थिक व्यवहाराचा भांडवली पाया भरभक्कम आहेही; परंतु सहकारी संस्थांमध्येच या दोन्हींची गुंफण सापडते. त्यांचे कार्यक्षेत्र फार विस्तारशील आहे. हेही खरे

अनुक्रमणिका

आहे की सर्व प्रकारच्या सामाजिक संस्था कामकरी वर्गाच्या सुप्त क्षमतांना वळण लावून त्यांना भव्यदिव्य सामाजिक कार्य करण्यासाठी जास्त निरपेक्ष महत्वाकांक्षेने उद्युक्त करू शकतात. परंतु सहकारी पद्धतीच्या संस्थाच फक्त हे भव्यदिव्य कार्य अतिभव्य प्रमाणात साधू शकतील. कारण त्यांची ध्येयेही उच्च आहेत व त्यांच्या अर्थव्यवहारांचा भांडवली पायाही भरभक्कम आहे."

इतर सामाजिक आणि आर्थिक तत्वप्रणालीच्या तुलनेने सहकारी तत्वप्रणालीचे मार्शल यांनी दाखविलेले गुणविशेष आपण पाहिले. आता सहकारी श्रद्धा व सहकारी तत्वे यांच्या मार्शल यांनी केलेल्या व्याख्या पाहू. या व्याख्या उच्च तत्वज्ञानी पातळीवरून व काव्यात्मक भाषेत लिहिल्या गेल्या आहेत त्यांचे मनन केल्याने कोणाही सहकारी मार्गस्थाला त्या मार्गावरील श्रद्धेचे अधिष्ठान सापडू शकेल. मार्शल लिहितात, "सहकारी श्रद्धा म्हणजे कामगारीवर्गाच्या एकोप्याने कार्य करण्याच्या निपुणतेवर, उदात्तपणावर, आणि सौंदर्यावर असलेली दृढ श्रद्धा होय. कारण कामकरीवर्ग सहकारी कार्यात स्वत.ची साधनसामग्री वापरून स्वतःचे भौतिक व नैतिक जीवनमान धीरे धीरे उंचावण्यात प्रयत्नशील राहातात. त्यांना अल्पकाळात अद्भुत क्रांती घडवून आणावयाची नसते." या व्याख्येवरून पुनश्च हेच दिसते की भौतिक व्यवहारापेक्षा त्याच्या नैतिकतेवर भर देऊन मार्शल यांनी इतर तत्वप्रणालींपेक्षा सहकारी श्रद्धेची जास्त नैतिक श्रेष्ठता दाखवून दिली आहे. सहकारावर श्रद्धा असल्याचा दावा करणाऱ्यां-कडून मार्शल यांनी पुढील पांच दंडकाचे पालनाची अपेक्षा धरली : (१) त्यांचे मते प्रत्येक सहकाऱ्याने सत्याची कास सोडून कधीही त्याऐवजी मनोहारी रंगांनी चमचमणाऱ्या काल्पनिक अर्थान्वियाकडे आकर्षित होऊ नये. (२) समाजातील सध्याचे खाजगी मालमत्तेचे वाटप सर्वोत्तम पद्धतीचे आहे असे मानू नये. (३) म्हणूनच श्रीमंत वर्गाकडून कररूपाने जास्त उत्पन्न काढून घेणाऱ्या करपद्धतीला त्याने पाठिंबा द्यावा म्हणजे ते करांचे उत्पन्न असंख्य गरीबवर्गावर खर्ची पडून त्यांचे भौतिक व नैतिक जीवनमान सुधारण्याची शक्यता निर्माण होईल. (४) कररूपाने काढून दिल्या गेल्या उत्पन्नाव्यतिरिक्त आणखी संपत्तीचा भाग श्रीमंत वर्गाने सार्वजनिक हितासाठी खर्च करणे हे त्यांचे खाजगी कर्तव्यच आहे असे मत निरपवादाने सहकाऱ्याने पुरस्कारीत जावे. (५) शेवटी वैयक्तिक ऐषारामात भपकेबाजपणा दाखविणे, कौटुंबिक खर्चात उधळपट्टीचा व्यवहार करणे याला सहकाऱ्याने विरोध दाखवावा. अर्थात् हे पाचही दंडक सहकाऱ्यांनी स्वतः पाळावयाचे व ते फक्त इतर लोकांकरिता आहेत ही गैरसमजूत टाळायची. असे न करता जर सहकाऱ्यांनी कोणताही दंडक

मानला व पाळला नाही तर ते सहकारी तत्त्वांची क्रूर चेष्टाच करतील असे मार्शल यांनी बजावले.

सहकारी तत्त्वांचा उल्लेख "सहकाराची मूलभूत तत्त्वे" या शब्दांत मार्शल यांनी केला आहे. त्यांनी दिलेली ही मूलभूत तत्त्वे सर्वमान्य व अधिकृत "सहकारी व्यवहाराच्या तत्त्वांपेक्षा" वेगळी आहेत. दोन्ही प्रकारची तत्त्वे सहकारी चळवळीच्या यशास सारख्याच प्रमाणात आवश्यक आहेत असे जरी मानले तरी मार्शल यांनी दिलेली मूलभूत तत्त्वे जास्त वरच्या पातळीवर व अग्रहक्काची आहेत हे जाणवते. याचे कारण असे की सहकारी व्यवहार कोणत्या तत्त्वावर करावयाचा हे सांगणारी तत्त्वे सहकारी व्यवहाराची आधी अपेक्षा करतात; परंतु मार्शल यांची सहकाराची मूलभूत तत्त्वे ही सहकार कसा करावा हे त्यातील व्यक्तिगत सभासदाला समजावून सांगतात. ही तत्त्वे खालीलप्रमाणे आहेत :

( १ ) उत्तम व्यक्तिमत्त्वाची प्राप्ति, वाढ व जोपासना करणे व निव्वळ भौतिक साधनांच्या वैपुल्याने जास्तीतजास्त फायदा मिळविण्याचे ध्येय न ठेवणे. याठिकाणीहि मानवी शक्तीवर व तिच्या उच्चस्तरीय मूल्यांवर भर दिलेला दिसून येतो.

( २ ) स्वतःचे व स्वतःच्या गणगोतांच्या भौतिक सुखप्राप्तीत गुरफटून राहून अपूर्ण जीवन जगण्यापेक्षा प्रत्येक सहकारी व्यक्तीला समाजकल्याण करण्याची संधी देऊन तिचे जीवन सार्थ व परिपूर्ण करणे.

( ३ ) स्वतःच्या सुप्त क्षमतांचा सामूहिक प्रयत्नांद्वारे व सामूहिक सामग्रीद्वारे विकास घडवून आणणे व अशा प्रयत्नात विशेषतः तोकड्या भांडवलाची अडचण येऊ न देणे.

( ४ ) असंख्य कामकरी वर्गाला स्वयंपूर्ण बनवून त्याला अल्पसंख्यांक धनिकवर्गाच्या वरचढ सत्तेच्या सर्व प्रकारच्या दडपणांतून मुक्त करणे.

– शेवटच्या मूलभूत तत्वाचे बाबतीत मार्शल यांनी असेही म्हणून ठेवले की, कामकरीवर्गाला आपल्या बहुसंख्यत्वाचा फायदा घ्यावयाचा असेल तर त्यांच्यात परस्पर विश्वास व संघटन वाढले पाहिजे व सामूहिक कार्यात प्रत्येकाचा सहभाग हवा. समाज व विशेषतः श्रमजीवीवर्ग जास्त जास्त संघटित होणे हे सहकारी चळवळीच्या यशास अत्यावश्यक असल्याचे त्यांनी सांगितले. विचार केला तर समजते की आजसुद्धा गरीब व अविकसित देशात सहकारी चळवळ योग्य प्रमाणात व योग्य पद्धतीने जोम धरून वाढीस

लागत नाही. याची कारणे सामाजिक तणाव व आर्थिक संघर्ष सारखा वाढत जात आहे यातच सांपडतात.

सरतेशेवटी मार्शल 'सहकारी मूलभूत तत्वे" म्हणून ज्यांची व्याख्या व वर्णन देतात त्याला "समाजनीतीचे दंडक" असेसुद्धा संबोधणे योग्य होईल असे मला वाटते. कारण हे जे चार दंडक आहेत ते आत्मविकास, समाज-सेवा, सामाजिक एकोप्यातून सामाजिक बल व आत्मनिर्भरता या स्वरू-पांचे असल्याने सहकारी मार्गस्थाला ते जितके मार्गदर्शक व श्रेयाचे ठरतात तितकेच ते दैनंदिन जीवनात 'गद्य' स्वरूपाचा आर्थिक व्यवहार "कर-णाऱ्या व्यक्तींनाही उपकारक ठरतात. किंबहुना हे चार दंडक १८८९ साली इप्स्वीच् येथे भरलेल्या सहकारी कार्यकर्त्यांच्या मेळाव्यात विषद करून सांगताना ते सर्व प्रकारच्या समाजसंघटकाना उपयोगी पडतील अशीच दृष्टि मार्शल यांनी ठेवली होती असे मला वाटते. ते म्हणतच असत की अधिकृत सहकारी चळवळीच्या प्रेरणा आणि इतर सामाजिक संघटनेच्या प्रेरणा यात फारच थोडे अंतर आहे. लोकसंग्रह व लोकसंघटन करून समाजकल्याण साधणारे हे अधिकृत सहकारी कार्यकर्त्यांइतकेच "सहकारी" या संज्ञेस पात्र ठरतात.

## ३ सहकारी व्यवस्थापनावर मार्शल यांचे विचार

मार्शल यांच्या सर्व लिखाणात व भाषणात तत्कालीन इंग्लंडातील अर्धे शतक काढलेल्या सहकारी चळवळीपुढे उपस्थित झालेल्या विविध प्रश्नांचे विवेचन आढळते. उदाहरणार्थ सहकारी संस्थांच्या यशास पोषक ठरणारी सामाजिक पार्श्वभूमि, 'विधायक सहकार', सहकारी संस्थांवरील केंद्रीभूत नियंत्रण, निव्वळ नफा वाटपाचे महत्व, वितरक सहकारी संस्था, तयार माल उत्पादन करणाऱ्या सहकारी संस्थांचे फायदे, खऱ्या सहकारी कार्यकर्त्यांचे गुण इत्यादी. या सर्व विवेचनांचा संक्षेपाने विचार करून स्थिर गतीने व शिस्त-बद्धपणे सहकारी चळवळींची प्रगति अविकसित देशात व सर्व जगभर होण्यास या विवेचनातून कोणती उपयुक्त मूल्ये व मार्गदर्शन आढळतात हे पाहू या.

### (अ) सहकारी यशस्वितेची सामाजिक पार्श्वभूमि

मार्शल तत्कालीन इंग्लंडमधील सहकारी चळवळीचे सूक्ष्म अवलोकन करीत असत. या कामात त्यांची सामाजिक व आर्थिक प्रक्रियांच्या तळाशी जाणारी भेदक दृष्टि त्यांना उपयोगी पडली. त्यांच्या मते सहकारी चळवळीच्या यशाची कारणे औद्योगिक क्रान्तीने निर्माण केलेल्या अनुकूल आर्थिक वातावरणांत

अनुक्रमणिका

जितकी सापडतात तितकीच ट्यूटॉनिक वंशाच्या इंग्रजी माणसाच्या खेळीमेळीच्या उपजत अशा जुन्या संवयीने अंगवळणी पडलेल्या सहकारी वृत्तींत सांपडतात. ( भारतीय लोकांमध्ये सुद्धा प्राचीन कालापासून अशी उपजत सहकारवृत्ती दिसते असे मार्शल यांनी जाताजाता नमूद करून ठेवले आहे. )

औद्योगिक क्रांतीमुळे आर्थिक प्रगतीचा वेग एकदम वाढला तरी त्याचबरोबर औद्योगिक संस्कृतीतील नवीन अरिष्टे इंग्रजी समाजावर कोसळली. यांना तीव्र नापसंती दाखविणाऱ्या ज्या प्रतिक्रियात्मक विचारप्रणाली स्फुरल्या त्यांत समाजवादाइतकेच सहकारी वादाचे महत्व आहे. सहकारी चळवळीचे जनक रॉबर्ट ओवेन व त्यांचे रॉचडेल सांप्रदायांतील इतर सहकारी पुढारी हे त्याच प्रतिक्रियात्मक विचारसरणीचे प्रतिनिधी होत. रॉबर्ट ओवेन स्वत: अत्यंत हुशार व सचोटीने सहकारी अर्थव्यवस्थापन करण्यात निष्णात होते. त्याचबरोबर समाजकल्याणाचे साधन व साध्य अशा दुहेरीउद्देशाने मनुष्याच्या चारित्र्याच्या विकासाकडे ते दुर्दम्यपणे लक्ष पुरवीत असत. ओवेन व त्यांच्या सहकाऱ्यांनी व्यावहारिक प्रयोग करून सहकारी प्रस्थापनेत नवीन नवीन व्यवहारपद्धति व नियम निर्माण केले. उदाहरणार्थ विविध उद्देशांसाठी भांडवली नफ्यातून गंगाजळी निर्माण करणे व भागांशाचे समान वाटप करणे. या नवीन सृजनशील कल्पनांमध्ये ध्येयवाद व व्यवहारी वृत्ती यांची इतकी उत्तम सांगड घातली गेली असल्याचे मार्शल यांनी दाखवून दिले की, तिला अर्थव्यवहाराच्या सबंध इतिहासात तोड नाही. रॉबर्ट ओवेन व त्यांच्या सहकाऱ्यांची हीच श्रद्धा होती की अंतिम परिणामी उत्तम सहकारी पद्धति समाजांतील दुर्बल घटकांची सेवा करून स्पर्धाधिष्ठित अर्थव्यवस्थेला मागे सारील.

## (ब) विधायक सहकार

मार्शल यांनी विश्वासपूर्ण निर्वाळा दिला की इंग्रजी माणसे प्रखर व्यक्तिमत्वाची असल्याने त्याच सामर्थ्यावर उद्योग आणि व्यापार यामध्ये विधायक सहकाराचा उपयोग करून जलद व उत्तम तऱ्हेने ते आपला उत्कर्ष साधू शकतील. त्याचे म्हणणे असे की तांत्रिक अर्थाने ज्याला सहकार म्हणतात हा बंधुभावाने प्रेरित झालेल्या निश्चयी वृत्तीचा एक आविष्कार आहे. परंतु दुसरा तत्सम आविष्कार म्हणजे " विधायक सहकार्य " हा होय की जो मुख्यत्वे करून १९ व्या शतकांतील ब्रिटनच्या औद्योगिक क्षेत्रांतील अग्रगण्यत्वाचा मुख्य आधार ठरला. विधायक सहकाराची मार्शल यांनी बरीच उदाहरणे दिली. लँकेशायर येथील कापडधंद्यांत औद्योगिकसंशोधन, उत्पादनपद्धतींच्या तांत्रिक माहितीचे

व संकेताचे वितरण, निर्यात व्यापारांत सामूहिक कार्य, रेल्वे वहातुकीची सहकारी पद्धतीने व्यवस्था, परकीय वकिलातींनी ब्रिटिश व्यापाऱ्यांना दिलेली कागदोपत्री मदत, एक ना दोन, अशा अनेक संलग्न कार्यक्षेत्रांत विधायक सहकाराचा वापर झालेला दिसतो. ब्रिटिश उद्योगांना याचा फायदा असा झाला की, मालाचे प्रमाणीकरण, तरबेजपणा व मोठ्या प्रमाणावर व्यापारी व्यवहारांचे व्यवस्थापन – कीं जे फक्त फारच मोठ्या उद्योगधंद्यांना परवडण्यासारखे होते – साध्य झाले, त्यामुळें छोट्या उद्योगधंद्यांना मक्तेदारी असलेल्या मोठ्या उद्योगधंद्याबरोबर स्पर्धेचा, सामना करून आपले स्थान टिकविता आले. "विधायक सहकार" व "सहकार" यांमधील फरक मार्शल यानी खालील शब्दांत सांगितला – "विधायक सहकार हा सहकाराइतका उच्च प्रतीचा नसतो. कारण पहिल्यात हेतुपुरस्सरपणे सर्वांच्या फायद्यासाठी कार्य करण्याची भूमिका नसते. त्याचप्रमाणे प्रसंगविशेषी स्वतःच्या फायद्यांतील वाट्याचा सार्वजनिक हितासाठी त्याग करून काम करण्याची वृत्ती आढळत नाही. असे असले तरी दोन्ही प्रकारच्या सहकारात फारच जवळचे नाते आहे."

यावरून पुन्हा हेच स्पष्ट होते की, सहकारी संस्था व त्यांचे कार्य जास्त उच्च नैतिक पातळीवर आहे असे मार्शल यांना म्हणावयाचे होते.

## (क) सहकारी संस्थांवरील केन्द्रीभूत नियंत्रण

सर्व प्रकारच्या सहकारी संस्यांवर, आणि विशेषतः घाऊक व्यापार करणाऱ्यांवर, केन्द्रीभूत नियंत्रण असता कामा नये. कारण त्यामुळें व्यक्तिगत सभासदांना एरवी मिळणारे संध्या, शिक्षक, स्वतंत्रपणा व महत्त्वाकांक्षी संकल्प यांच्या मर्यादा संकुचित होतात. सहकारीवर नियंत्रण केन्द्रीभूत झाले म्हणजे उच्च पातळीचे व्यवस्थापक योग्यपणें स्वकर्तव्ये करण्यापेक्षा जास्त प्रमाणांत आपला वेळ व शक्ती आपल्या सहकाऱ्यांना उपदेश करण्यात व शिकविण्यातच खर्च करतात. इतके की स्वतःचे काम व्यवस्थित बजावण्यास त्याना वेळच मिळत नाही. केन्द्रीभूत सत्तेच्या नियंत्रणाखाली चालविलेल्या सहकारींच्या व्यवस्थापक मंडळाचे अधिकार व कामे ही एकाद्या खाजगी पातीदारीच्या मोठ्या संचालकांच्या अधिकार व कामांप्रमाणेच भासू लागतात. याचे दुष्परिणाम मार्शल यांनी खालील शब्दांत वर्णिले आहेत. ते लिहितात –

> "माझ्या मते केन्द्रीभूत नियंत्रणाचा मुख्य धोका हाच की गुंतविलेल्या भांडवलाच्या प्रमाणांत सहकारी व्यवस्थापनांत तरबेज झालेल्या व्यक्तींची संख्या बोटावर मोजण्याइतकीच राहाते आणि अशा

व्यवस्थापनांत जास्तीत जास्त तरबेज व्यक्ती तयार करणे हीच एक गोष्ट सहकारींना अभिमानास्पद असते. मग या दोन्हींचा मेळ बसावा कसा ? ”

## (ड) निव्वळ नफा वाटपाचे महत्त्व

मार्शल यांनी स्पष्टपणे सांगितले की कामगारांना नफ्याचा लाभांश देण्याच्या पद्धतीचे विशेष समर्थन करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. कारण ही पद्धत मुळांतच व्यवस्थापनाचे एक उत्तम शस्त्र आहे, मग संस्था सहकारी असो वा इतर प्रकारची असो. अर्थात् नफावाटप करणे हे साध्य नव्हे तर आर्थिक व्यवस्थापन सुधारून ते कार्यक्षम करण्याचे साधन आहे. किंबहुना सहकारी भावनेचे नफावाटप हे एक सुंदर फळ आहे, असेच मार्शल समजत. परंतु नफा-वाटपाचा कोणत्यावेळी उपयोग करावयाचा व त्यायोगे अकार्यक्षमता, हलगर्जी-पणा व आक्षेपार्ह कार्यपद्धतीने आपल्या व्यवस्थापनातून उच्चाटन कसे करावे हे सहकारी संस्थांनी जाणले पाहिजे असा मार्शल यांचा आग्रह होता.

नफावाटपाच्या पद्धतीचे मुळात स्वरूप मार्शल यांना कसे दिसले हे पाहण्यासारखे आहे. वेगळ्याच संदर्भात त्यांनी असे विधान केले की, खाजगी धंद्यात बरेवाईट दिवस येत असल्याने त्यांना आपल्या नोकरवर्गाला नफ्या–तोटयात समभागी करावे लागते व त्यामुळे नोकरवर्गाच्या पगारामधे चढउतार होऊन त्यातील तथाकथित खंडाचे प्रमाण बदलते. परंतु मार्शल यांना महत्व वाटले ते या गोष्टीचे की नफा–तोटयातील सहभाग हा वेतनकरारात जेव्हा केलेला नसतो तेव्हा तेव्हाच अशा सहभागाला फार उदात्त आशय प्राप्त होतो. या आशयाचा गाभा हाच की, “ एकाच धंद्यात एकेठिकाणी खांद्याला खांदा लावून काम करणाऱ्या सेवक–मालक वर्गातील बंधुभावाचे नाते उदार अंतः-करणाने व सौहार्दाने मान्य केले जाते. असे क्वचित् घडते. पण जेव्हा असे घडते तेव्हा सेवक–मालक संबंध वरच्या नैतिक व आर्थिक पातळीवर राहातात, या पातळीवर राहूनच पुढचे अवघड पाऊल टाकून निर्मळ सहकार करण्याची तयारी जेव्हा होते तेव्हा हे मालक–सेवक संबंध त्याहून जास्त वरच्या पातळीवर पोहोचतात. ’

यावरून हेच दिसते की, मार्शल याचे मते नफावाटप हे नुसते एक महत्वाचे व्यवस्थापनाचे शस्त्र नसून त्याच्यात सुनीतीचा भाग मोठा आहे.

## (ई) वितरक सहकारी संस्था

१८८९ मधे इप्स्वीच् येथील सहकारी मेळाव्यापुढे केलेल्या भाषणात वितरण सहकारींच्या कार्याचा आढावा घेत असताना मार्शल यांना असे आढळले की, किरकोळीने व्यवहार करणाऱ्या सहकारींची संख्या प्रमाणाबाहेर वाढल्याने विक्रयखर्च वाढला होता व गैरप्रकार जास्त जास्त घडत होते. हे खरे की या सर्व सहकारी नफ्यात चालत होत्या. तरीपण त्याबद्दल फार गर्व वाटण्याचे किंवा स्वतःच्या व्यवस्थापन चातुर्याविषयी अवास्तव कल्पना करण्याचे सहकारी सेवकांना कारण नव्हते असे मार्शल यांनी बजावले. किरकोळीने व्यवहार करणाऱ्या सहकारी विक्रय संस्थांच्या नफ्यामागे गहनगुपीत असे नसतेच. कारण एकतर सभासदच गिऱ्हाईक असल्याने हमखास ग्राहकत्व देऊन दोष सामावून घेतात. दुसरे असे की, किरकोळीने फार मोठ्या प्रमाणावर चालणाऱ्या व्यवहारात सहजच विपुल–खर्च बचत होत असल्याने निव्वळ सचोटीने व शहाणपणाने व्यवहार केला तर किरकोळीने विक्रय करणाऱ्या सहकारी संस्था नफ्यात चालतात. त्याला दुर्मिळ व्यवस्थापन नैपुण्याची फार करून गरज लागत नाही. घाऊक प्रमाणावर विक्रय करणाऱ्या सहकारी संस्थांचे बाबतीत मार्शल यांना असे आढळले की व्यवस्थापकांनी दूरदृष्टी ठेवून, गिऱ्हाईकांची मागणी असलेल्या विविध प्रकारच्या योग्य वस्तू योग्य भावात पुरवून व जमल्यास अशा मालाचे स्वतःच उत्पादन सुरू केल्यास त्यांना देखील विपुल खर्चबचतीचे फायदे मिळविता येतात. अर्थात् येथे धोक्याची सूचना अशी देऊन ठेवली आहे की, उत्पादक सहकारी संस्था चालविणे सुरुवातीला चांगलेच अवघड काम होऊन बसते. परंतु सुरवातीच्या अडचणीतून मार्ग काढण्यात यश मिळाले तर याही संस्थांची बाजारात दोन हात करण्याची क्षमता वाढते.

## (फ) प्रक्रियाकृत मालाच्या उत्पादक सहकारी संस्था

या संस्था स्वतंत्र पायावर उभ्या करणे फारच अवघड काम आहे. कारण या कामात किरकोळी व घाऊक व्यापार करणाऱ्या सहकारी संस्थाना उपयोगी पडणाऱ्या साधारण प्रतीच्या व्यवस्थापन–कसबाचा फारसा उपयोग होत नाही. त्यांनी उच्च दर्जाचे व्यवस्थापन–कसब लागते. त्यांच्या अडचणीच्या भरीला त्याना खुल्या स्पर्धेत विचार-चापल्य व व्यवहार-चातुर्य ज्यांचे ठिकाणी आहे अशा सुशिक्षित व सर्जनशील व्यवस्थापन निपुणांशी सामना करावा लागतो. फिरून जर सहकारी उत्पादक संस्थांना न झेपेल

अशा कामात यश आले नाही तर त्यांचेच पूर्वीचे उच्चश्रव स्तुतिपाठक त्यांच्या अपयशाचा मोठ्याने डांगोरा पिटण्यास कमी करीत नाहीत. अशाने लोकांचा सहकारींवरचा विश्वास कमी होतो. याला एक उपाय म्हणजे योग्यतऱ्हेने सार्वजनिक माहितीसाठी जाहिरात करणे; मार्शल त्याला अनुकूल होते. शेवटी आणखी एक अडचण म्हणजे तांत्रिक ज्ञान आणि धंद्यातील व्यवस्थापन-कौशल्य असणाऱ्या मूठभर व्यक्ती कालवश झाल्या वा इतर कारणांनी दुरावल्या तर प्रक्रियाकृत मालाच्या उत्पादक सहकारी संस्था कायम बसण्याचीच शक्यता फार असते.

ही सर्व कारणे लक्षात घेऊनच मार्शल यांनी असे प्रतिपादले की, प्रक्रियात्मक माल उत्पादणाऱ्या सहकारी संस्था स्वतंत्र असण्यापेक्षा त्यांचे एक भक्कम संयुक्त संस्थान ( Federation ) उभे करणे श्रेयस्कर. असे केल्यावर मग बाह्य मदत त्यातील सभासद संस्थाना देऊन त्याना अशा प्रक्रियाक्षेत्रात यशस्वी करता येईल की जेथे दुर्मिळ कसबाची गरज नसते, वक्तशीरपणा, टापटीप, शिस्त, काटकसर आणि धीरगंभीर वृत्तीने मार्गक्रमण करण्याची इच्छाशक्ती इतक्या गुणांचीच जरूरी असते. अशी साधी गुणवान सेवक माणसे मिळाल्यास श्रमजीवी वर्गात ज्या सामान्य उपभोगाच्या वस्तू मोठ्या प्रमाणावर नियमितपणे खपतात त्याचे प्रक्रियात्मक उत्पादन या सहकारी उत्पादक संस्थांना हाती घेण्यात काहीच अडचण पडणार नाही.

तत्कालीन इंग्लंडमध्ये प्रक्रियात्मक उत्पादन करणाऱ्या सहकारी संस्थांचे यशास कारणीभूत होण्याचे श्रेय सहकारी " गिल्डस् " सहकार साहाय्य संस्था, कामगार मंडळे व सहकारी युनियन या व अशांसारख्या संस्थाना मार्शल यांनी दिले. कारण मदत देऊनसुद्धा त्या सहकारी संस्थांच्या कामात बाहेरून हस्तक्षेप केला गेला नाही.

## ( च ) व्यापारी सहकारींच्या व्यवस्थापनातील अडचणी

सेवक व नोकर यांच्यातील आदर्श स्वरूपाचे परस्पर संबंध कसे असू शकतील हे दाखविण्यासाठी मार्शल यांनी अशी कल्पना केली की, जर एकाद्या सहकारी संस्थेचे सभासदत्व सेवकांची कामे करू लागले तर जे सेवक तेच मालक अशी परिस्थिती असेल आणि मग सरकारी व खाजगी क्षेत्रात मोठ्या उद्योगधंद्यात जी दप्तरदिरंगाई व्यवस्थापनात सापडते तिचे उच्चाटन अशा सहकारी संस्थेतून करता येईल. त्याचबरोबर वरच्या पातळीवरील व्यवस्थापनाची कामे ही सचोटीने आणि कार्यक्षमतेने पाहिली जातात की नाही हे

मालक–सेवक असलेले सभासद नोकर आपले आपणच पाहू शकतील. तसे बारकाईने करण्याची व व्यवस्थापनातील तपशीलवार दोष शोधून काढून ते दूर करण्याची त्यांना संधी मिळेल.

परंतु प्रत्यक्ष परिस्थिती या आदर्शाच्या अगदी जवळ येऊन ठेपली तरी सहकारी संस्थेच्या प्रत्यक्ष व्यवहारात मात्र सभासद व्यक्तींचे खाजगी हित व सहकारी संस्थेचे हित यातील द्वैत पूर्ण नाहिसे होणे अवघड आहे. याची कारणे मार्शल यांनी खालील शब्दात विषद केली :

> "मनुष्यस्वभाव लक्षात घेता हे अटळच असते की कोणत्याही समूहात मत्सर व दोषारोपाचा राग वाटून आधुनिक आर्थिक व्यवस्थापनाच्या मुलायम यंत्रात त्या मत्सराचे व रागाचे खीळ घातल्याप्रमाणे तुकडे जाऊन बसतात. हा मत्सर व राग उच्च पदाधिकाऱ्यांबद्दल असतो. व्यवस्थापनाचे अवघड काम त्यांना बाहेर देखावा न करताच करावयाचे असते. परंतु जे सेवक खालच्या पातळीवर साधे व कमी कसब लागणारे काम करतात त्यांना याची कल्पना नसते की, व्यवस्थापनातील उच्च पदाधिकाऱ्यांना केवढे बौद्धिक श्रम पडतात. त्यामुळे त्यांना मोठे, पण बाजारभावाप्रमाणे योग्य, वेतन जे मिळते ते अनाठायी दिले जात आहे अशीच निम्नपदस्थ सेवक तक्रार करीत राहातात."

–मार्शल यांनी नाखुषीने मान्य केले की, प्रत्यक्षात सहकारी संस्थांच्या व्यवस्थापनातील अधिकारी क्वचितच हुषार, सर्जनशील व अष्टावधानी सापडतात. कारण जे खरोखरी इतके गुणवान असतात ते खासगी क्षेत्रातील धंद्यांकडे आकर्षिले जातात. या कारणाने सर्व समाजात सहकारी पद्धतीची अर्थव्यवहाराची जुळवणी पूर्णत्वाला पोहोचत नाही. जिथे ती अपूर्णांशाने कार्यवाहीत असते तेथे मिळालेले धंद्यातील यश हे विशेष शह व धोका नसलेल्याच क्षेत्रात मिळते. किरकोळीने विक्रय करणाऱ्या सहकारी संस्थांचे यश हे त्यापैकीच एक.

व्यवस्थापनात मालक वर्गाबरोबर सेवकवर्गाची भागीदारी असल्यास ती बव्हंशी कार्यक्षम नसते व सुरळीत चालत नाही हे मार्शल पुरेपूर जाणून होते. तरीसुद्धा सेवकवर्गाला व्यवस्थापनात सहभागी करावे हे आपले आग्रही मत त्यांनी खालील शब्दात मांडले —

"मी या मताकडे झुकतो की भाग-भांडवलाचे मालक व व्यवस्थापन अधिकारी याना वाटते त्यापेक्षा निश्चितच व्यवस्थापनाच्या संचालक समित्यांतील सेवकवर्गाच्या सहभागाचे प्रत्यक्ष फायदे जास्त आहेत व तोटे कमी आहेत. या बाबतीत मला असे वाटत आलेले आहे की, सहकारी भावनेच्या स्फुल्लिगाला येथे फार अवघड आविष्कार करावयाचा आहे. पण जर ते करण्यात यश आले तर अंतिम परिणामी ते सर्वतोपरी उपकारकच ठरेल."

-हा जो मार्शल यांचा आशावाद होता त्याचे दोन आधार होते. एकतर सेवकवर्गाची व्यवस्थापनात भागीदारी चालू करणे म्हणजे त्याना उपयुक्त शिक्षण देण्यासारखेच आहे आणि दुसरी बाब ही की समजा व्यवस्थापकाला बिकट समस्या निर्माण झाल्या तर त्या इतर जास्त अनुभवी व निष्णात अशा इतर सहकारी व्यवस्थापनांच्या बाह्य मदतीने सोडविता येतील. पण ही केवढी मोलाची गोष्ट आहे की व्यवस्थापनात सहभाग दिला गेलेले सेवक एके दिवशी स्वतःच अत्यंत निष्णात व्यवस्थापन अधिकारी बनू शकतील.

## (छ) उत्तम सहकारी कार्यकर्त्यांचे आवश्यक गुण

उत्तम सहकारी कार्यकर्त्यांचे आवश्यक गुण म्हणून प्रथम मार्शल यानी हे स्वच्छ शब्दात सांगून टाकले की, ज्यांचे व्यक्तिमत्त्व प्रखर व आत्मकेंद्रित आहे व जे संवयीने स्वतःच्या खाजगी हितसंबंधाना स्वतःला वाहून घेतात त्यानी आपल्या भौतिक उत्कर्षाचा मार्ग खाजगी उद्योगधंद्यांच्या क्षेत्रातच चोखाळावा हे श्रेयस्कर. त्यांचे "मते ज्यांचे अंगी समाजकल्याण करण्याची ईर्षा प्रकर्षाने तळपते आहे आणि ज्यांना आपल्या अवतीभंवतीच्या समाजापासून दूर न राहता लोकसंग्रह करून त्याचे पुढारीपण करावयाचे आहे त्यानाच सहकारमार्ग उत्तम, योग्य व सोयीचा ठरतो. हे जरी खरे असले तरी बऱ्याच अंशी सहकारातील आशा व महत्त्वाकांक्षा प्रत्यक्ष कृतीपेक्षा फारच मोठ्या आकाराच्या असतात; तरीसुद्धा हे मान्यच करावे लागते की, त्या आशा व महत्त्वाकांक्षांच्या मूलप्रेरणा या नैतिक हेतूत रुजलेल्या असतात."

सहकारी मार्गस्थाच्या व्यवहारनैपुण्याबद्दल बोलताना मार्शल यानी असे सांगितले की त्याने धंद्यातील चातुर्याला गाढ श्रद्धेची जोड द्यावी.

असे झाल्यास त्याला सहकारी चळवळीची उत्तम सेवा बजावता येईल; सहकारी काम वाकबगारपणे, जोमदारपणे व कर्तव्यकठोरपणे करता येईल. तसेच खासगी क्षेत्रात मिळते त्यापेक्षा कमी मिळणाऱ्या वेतनात समाधान मानण्याचे मनोधैर्य त्याला लाभेल. अशा धारणेची माणसे बाहेरच्यापेक्षा सहकारी क्षेत्रातच आढळत असली तरी ती तितकी सामान्यपणे सर्व जागी आढळत नाहीत. मार्शल यांची श्रद्धा होती की शिक्षण व सहकारी तत्वांचा प्रसार यायोगे जास्त जास्त लोकाना सहकारी कार्य करण्याची शक्ती व इच्छा प्राप्त होईल. याच श्रद्धेच्या बळावर सर्व सहकारी मार्गस्थांनी निश्चयानी पावले पुढे टाकीत रहावे असा त्यानी आदेश दिला.

मार्शल यांनी केलेल्या चर्चेचा सर्व रोख याच गोष्टीकडे होता की, लोकांचा विश्वास संपादन करण्यासाठी सहकारी संस्थांनी मंदगतीने पण पूर्ण पद्धतशीरपणे अर्थव्यवहार करीत राहिले पाहिजे. असे केले तरच त्यांची पत वाढते व भांडवलाची पुरेशी तरतूद करण्याची पात्रता त्यांना मिळू शकते. प्रत्येक सहकारीच्या पहिल्या काळातल्या प्राथमिक अडचणी मार्शल यांनी खालील शब्दात सांगितल्या,

"ज्या सहकारी कार्यकर्त्यांचे अंगी प्रांजलपणा व धंद्यातील कसब असेल आणि हे गुण त्यांच्यापाशी आहेत अशा सार्वजनिक मान्यतेचे "व्यक्तिगत" भांडवल ज्याचेपाशी असेल त्यांना फार मोठ्या प्रमाणावर प्रकल्पाला पुरेसे असे भांडवल प्राप्त करून घेण्यात कसलीच अडचण येण्याचे तत्वतः कारण नाही. खरी अडचण हीच की सभोवारसमाजातील पुरेशा व्यक्तींना अशा सहकारी व्यक्तींमध्ये आवश्यक ते गुण आहेत हे पटवून कसे द्यावे ?"

आधुनिक आर्थिक व्यवहार गुंतागुंतीचा व बिकट होत चालला असल्या-कारणाने नवीन सहकारी संस्थांना गंभीर समस्यांना तोंड द्यावे लागते. यासाठी त्यांना सुरुवातीच्या काळात निष्णात व सज्जन सहकारी सेवकांची व चालकांची गरज असते. भांडवलशाही पद्धतीत भांडवल मजुराला कामाला लावते, तर सहकारी पद्धतीत मजुरवर्ग भांडवलाला कामाला लावते असे म्हणण्यापेक्षा स्वतःच्या खांद्यावर असलेल्या मेंदूच्या शक्ती व क्लृप्ती यांच्या साहाय्यानेंच सहकारी प्रशासक भांडवलाला हाताशी कामाला धरतात, असे मार्शल यांनी सुचविले.

## समारोप

सहकारी तत्वज्ञान व अर्थव्यवहाराची जुळवणी या विषयावर मार्शल यांनी केलेल्या विचारमंथनाचा येथे घेतलेला आढावा निःशेष नाही. मार्शल यांनी केलेले लिखाण आणि भाषणे वाचताना कित्येक स्थळी फार मोठ्या आशयाची

विधाने सहज जाता जाता केलेली आढळतात. या सर्व विधानांवरून मार्शल यांची सहकारी आचार–विचारांवर निस्सीम श्रद्धाच नव्हे तर त्याविषयी वचनबद्धता असल्याचे दिसून येते. निव्वळ अर्थशास्त्रज्ञानाच्या भूमिकेवरून सुद्धा दूरवर विचार केल्यावर ते या निर्णयाला पोहोचले की अनंत कालापर्यन्त मानवी सुप्त शक्तींचा मोठ्या प्रमाणावर टिकाऊ स्वरूपाचा विकास घडवून आणण्याचे सामर्थ्य सहकारात आहे ते लिहितात :

" ..... आता कुठे सहकाराच्या उच्चस्तरीय महान कार्याची मानवाला अंधुक जाणीव होण्यास सुरवात झाली आहे. असे असल्याने सहकारी पद्धतीच्या वेगवेगळ्या संघटनांमार्फत जास्त जास्त भव्यदिव्य असे यशसंपादन करता येईल अशी आशा करणे संपूर्णपणे वाजवीच ठरते. त्या संघटनांमार्फत वाढत्या संख्येने श्रमजीवी वर्गातील व्यक्तीना आर्थिक व्यवस्थापनाचे शिक्षण मिळत राहील, लोकांचा विश्वास संपादन करता येईल व क्रमाक्रमाने प्रत्येक व्यक्ती स्वतःच्या गुणांना व कर्तबगारीला योग्य अशा जबाबदार पदावर जाऊन आर्थिक व्यवस्थापन चोखपणे बजावू लागेल."

या लेखाच्या सुरुवातीलाच मी असे सांगून टाकले की, मार्शल यांना सहकारी पुढाऱ्यात कोणत्याही प्रकारचे अधिकृत स्थान नव्हते. परंतु त्यांचे सहकाराविषयी प्रगल्भ व प्रासादिक विचार लक्षांत घेता सहकारी क्षेत्रांत अधिकाराचे स्थान देण्यास कोणीही नाखुषी दाखवेल असे वाटत नाही. मार्शल यांची सहकारी मार्गावर भक्ती होती, म्हणूनच की काय एके ठिकाणी त्यांनी सहकाराचा "एक प्रसारणीय श्रद्धा" व "आधुनिक समाजदाक्षिण्य" असा उल्लेख केलेला आहे. सहकारावर लोकांची श्रद्धा वाढीस लावणे हे आधुनिक समाजांतील प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्यकर्मच आहे असे मार्शल मानीत असत. इप्स्विच येथील भाषणाच्या त्यांच्या समारोपाच्या शब्दांनी हा लेख पूर्ण करणे उचित वाटते. ते म्हणाले,

" जुन्या प्रकारच्या श्रीदाक्षिण्याचे दिवस संपलेले आहेत. परंतु आज धाडसाने व समाजदाक्षिण्यांने प्रेरित होऊन भव्य व दिव्य ध्येये गाठण्यासाठी आत्मसमर्पण करण्याची हांक पूर्वी इतकीच आर्त आवाजांत ऐकू येते. ज्याचे मन सहकारी श्रद्धेने पुरेपूर भारावलेले आहे त्यांना प्रत्यक्ष कामांत सहकारी संस्थांच्या भांडवली नफ्याच्या भागाला लालचावलेल्या बहुसंख्य सभासदांकडून पराभव पत्करण्याचा दुःखद प्रसंग वरचेवर येत असतो. तरीही धीर व विवेक न सोडता अंतिम यश मिळेपर्यन्त त्यांना पुनःपुन्हा या उदात्त संग्रामात उडी टाकून झगडत राहावे लागते व लागेल."

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

श्री. शं. बा. जोशी

# 'सवितृ' या शब्द-प्रतिमेतील सांकेतिकता

१ ) प्राचीन परंपरा व संप्रदायांच्या अर्थग्रहणाला, त्यातील सांकेतिकता मान्य करणे अनिवार्य आहे.

भाषेला इतिहास आहे. भाषेतील शब्दप्रतिमांचे अर्थ, त्या भाषिकांच्या जीवन 'समय'–परिसराशी निगडित असतात. 'समय' म्हणजे विशिष्ट कालीन सामाजिक जीवनसंदर्भातील आचार-विचारामुळे प्रतीतीस येणारा ( सांस्कृतिक पातळीवरील ) कालानुभव. सर्वांच्या परिचयाचे एक उदाहरण पाहा : 'दे.भ', हा संक्षिप्त संकेत; १९३० सालापर्यंत टिळक युगापासून 'दे(श) भ(क्त)' या अर्थाची ही सर्वमान्य शब्द–प्रतिमा. पण पुढे देशभक्ती खूप सवंग झाली ! या 'दे. भ.' गणात पोटभरूतर खरेच; निखळ स्वार्थी वर्ग दिसू लागतो. अशांच्या नावापुढील 'दे. भ' या सांकेतिक प्रतिमेत देशभक्षक व्यक्तीचे प्रतिबिंब दिसू लागते ! 'दे. भ' संकेताचा उलटा अर्थही करणे भाग पडते, 'गांधी टोपी' शुद्ध शुभ्र आचारशील वृत्तीची द्योतक होती; पण, आपल्या भ्रष्टाचारावर पांघरूण घालण्यास ही टोपी वापरात येऊ लागते; आणि मग 'गांधी टोपी'चेही विडंबन होते. लक्षात घ्यावयाचा मुद्दा हा की–शब्दसंकेताना 'इतिहास' आहे. शब्दातील 'अर्थ' तत्कालीन 'समया'च्या आवरणातच कळू शकतो. यामुळे भाषेतील शब्द-प्रतिमा सांकेतिक होणे अटळ आहे.

वेद, उपनिषदे, गीतादि ग्रंथात सांकेतिकता टिच्चून भरली आहे. याचे कारण वेगळे आहे. इतिहासाच्या संदर्भात आपोआप प्राप्त होणारी सांकेतिकता ही तर खरीच; पण 'शब्द-ब्रह्म' म्हणविणाऱ्या कविपुंगवांच्या प्रतिभा-विलासामुळे निर्माण होणाऱ्या सांकेतिकतेचा आणखीही एक प्रकार आहे ! उदा. अश्व-त्थ वृक्षः ( नवभारत जाने. १९७२ ). अशा संकेतानाही 'इतिहास' आहेच. पण या इतिहासातील हे संक्रमण सामान्य ऐतिहासिक घटनांसारखे सरळ नसते. ही 'वक्र' गती असते. अलंकारशास्त्रात, हा वक्रप्रकार शिष्टमान्य आहे. वक्रतेशिवाय ( without distortion ) सौंदर्यनिर्मिती होत नाही; हे अमान्य करून चालत नाही. आपण केश–सौंदर्य म्हणतो; 'कुंतल' यात

अनुक्रमणिका






केसातील सहजवक्रतेचा अर्थ सामावला आहे; मुळांत कुरळेपणा या अर्थाचा तो संकेत आहे. कुंतल < कूंदल हा देशी शब्द आहे. वक्रतेमुळे सौंदर्य निर्माण होते, हे मान्य करणे जसे जरूर आहे, तसे या वक्रोक्तीला काही मर्यादा असावी, हे का मान्य नसावे, हें कळत नाही ! पण आपल्या काव्यशास्त्रात ‘ वक्रोक्तिः एव आत्मा काव्यस्य ’ हे निरपवादस्वरूपात शिष्टमान्य झालेले दिसते ! वेदोपनिषदातील ‘ गुह्य ’ संकेतात आढळणाऱ्या वक्रोक्तीत बऱ्याच ठिकाणी मर्यादेचे अतिक्रमण होत असलेले दिसेल. अशा प्रकारच्या वक्रोक्तीना लाभलेल्या शिष्टमान्यतेमुळेच आजपर्यंत हे संकेत तगलेले दिसतात.

वेदोपनिषदे आपले हे ‘ सत्य ’ अ–निर्वाच्य आहे, ‘ निहितं गुहायां ’, ‘ गुहानिहितं ’ अशा स्वरूपाचे आहे, असे जाहीरपणे सांगत आहेत. यामुळे, सवितृ , सूर्यादि संकेतही ‘ गुहानिहित ’ ‘ सत्य ’ : अर्थयुक्त प्रतिमा नाहीत असे गृहीत धरून केला जाणारा अर्थ, सपशेल चुकीचा ठरण्याची भीती आहे, हे विसरून चालणार नाही. म्हणून ‘ सवितृ ’ संकेतामागील ‘ समय ’ कळणे अवश्य आहे.

## २ ) ‘ सवितृ ’ संकेतामागील ‘ समय ’ जाणणे अशक्य नाही.

अ ) ‘ ब्राह्मण ’ म्हणून समजल्या जाणाऱ्या वर्गात, ‘ व्रतबंध ’ वा ‘ मौजीबंधन ’ विधी, अजून संपूर्ण नष्ट झाला नाही. बटूला अर्थ कळो, वा न कळो, ‘ गायत्री ’ मंत्र-दीक्षा दिली जाते. ‘ त्रिकाल संध्या ’ गेली; तरी व्रतबंधाच्या वेळी संध्यावंदनाचे मंत्र शिकवण्याचे ‘ शास्त्र ’ ( फार्स ) अजून केले जाते. या संदर्भात सवितृ : सूर्य प्रार्थनेचा गायत्री मंत्राशी संबंध असल्याचे कळते.

आ ) i) ज्ञात गोष्टींच्या अनुषंगाने–साम्याच्या जोरावर–अज्ञात नवीन गोष्टीचा परिचय करून देण्यात येत असतो. ‘ सवितृ ’ यातील मूलार्थं जाणण्याचा काही ढोबळ प्रकार तर आहेच. शिवाय, गाण्यात गोष्टीत सविता–सूर्य ( नारायण ) असे म्हणण्याची प्रथाही सुप्रसिद्ध आहे. बलवत्तर कारणाशिवाय कोणतीही प्रथा अमान्य करण्याने, आपणहून अर्थग्रहणात अडचणी निर्माण केल्यासारखे होणार आहे.

ii ) ‘ सवितृ ’ यात असणाऱ्या सू > सव् या आख्याताचे अर्थ ‘ the root has sense of stimulating arousing, vivifying ( clearly ) ’ असे स्पष्ट आहेत म्हणून या दैवतप्रतिमेच्या विवरण-प्रसंगी म्याकडोनेल सांगतो. ( Vedic Mythology p. 34 ).

३ ) व्रतबंधसंप्रदायातील परंपरा व 'सवितृ' 'सूर्य' म्हणण्याची रूढी, आणि या शब्दप्रतिमेत्रा ( वैदिक देवताविषयी लिहिणाऱ्या ) म्याक्‌डोनेल्ल सारख्याना दिसणारा 'प्रकाश' सूचक अर्थ, अशा या तिन्ही गोष्टीतील अंतः-संगती लक्षात घेता हा 'सवितृ' देव 'प्रकाश' रूप असावा याविषयी शंका राहात नाही.

या प्रसंगी एक शंका डोकावते : 'सूर्य' हा सुप्रसिद्ध संकेत रूढ असता, 'सवितृ' या नवीन संकेताची काय आवश्यकता होती ? याची चर्चाही येथे जरूर ठरते.

व्रतबंधसंस्कारामुळे 'द्विजत्व' प्राप्त होते; अशी एक समजूत आहे. किंवा असेही म्हणता येईल की 'द्विजत्व' सिद्धीच्या साधनानुष्ठानासाठी, हा व्रतबंधसंस्कार केला जातो. व्रतबंधानंतर 'बटू', गुरूकडे अध्ययनाकरता पाठवला जात असे.

हे सांगण्याचा उद्देश एवढाच की 'द्विजत्व' म्हणून काही एक चीज आहे, या मानवीय जीवनात; हे लक्षात घेतल्याशिवाय 'सवितृ' दैवताच्या अस्तित्वाचे आकलन होणे शक्य नाही. 'जन्मना जायते शूद्रः, संस्कारात द्विज उच्यते.' पण मौंजीबंधनांतील संस्काराचा उद्देश विसरून, अशा फार्स वजा कृतीने, हे 'द्विजत्व', इतक्या सहजासहजी येत नसते. ब्राह्मणवर्ग फसला तो यामुळेच, अशांच्या योगे 'दिजत्व' शंकास्पद ठरले; हास्यास्पद झालेलेही दिसत आहे !

पण, यामुळे, मानवाला 'द्विजत्व' प्राप्त होत असते, हे खोटे ठरत नाही. मानवजीवनातील पहिल्या पातळीवरील ( Biosphere ) भाषा, भूमीशी सरपटत जात असते. ऐंद्रियक भाषा कळण्याला द्विजत्व जरूर नाही. इंद्रियगोचर ( स्पर्शेंद्रिय प्र-धान ) भाषा भौत पातळीवरील जीवनरीतीशी निगडित आहे. पण भाषेत 'ज्ञान'–अर्थ–असलें तरी, भाषा म्हणजेच ज्ञान : अर्थ नव्हे. भाषा येताच, 'पदवीधर' होताच 'ज्ञान' प्राप्त झाले ही समजूत फसवी आहे. 'Read between lines' म्हण आहे ! घरगुती भाषेत 'लेकी बोले सुने लागे' असा एक प्रकार आहे ! 'ऊर्ध्वोर्ध्वं' असणारे 'अर्थतत्त्व' 'धीरः पश्यति' असे अभिनवगुप्त सांगतो. 'Language is vertical', हा वाक्प्रचार चिंत्य आहे. हे अर्थतत्त्व भाषेच्या ( लंब समांतर पातळी ) वर 'धीरा'ना दिसत असते. ही 'धी' शक्ती प्राप्त होणे, म्हणजेच 'द्विज' सिद्धी, असे म्हणता येईल.

या द्विजत्वासाठी ' सवितृ ' उपासना आहे. ' सवितृ ' हे ' धी ' शक्ति-प्रेरक दैवत आहे; ही भारतीय पुरातन परंपरेतील श्रद्धा. ' धी ' शक्तीचा अमूर्त अर्थ : विचार : ज्ञानाशी निकट संबंध आहे, हे कोणालाही अमान्य नसणार. मानवाला सर्वप्रथम अर्थ : विचार सुचला, कळला तो पूर्वजांनी लिहून ठेवलेल्या ग्रंथामुळे नव्हे ! ग्रंथच नव्हते तेव्हा, हे कळले कसे ? ग्रंथामुळे अर्थ : विचार कळतो, अशी समजूत असणाऱ्याना ' सवितृ ' दैवताचे अस्तित्व कळणे शक्य नाही.

अर्थ : विचार हे मानवव्यक्ति निरपेक्ष स्वयंप्रकाशरूप तत्त्व आहे. स्थूल भाषेत, आपणाला कळले असे सांगताना ' हा आता डोक्यात थोडा प्रकाश पडला ' असे म्हटले जाते म्हणून ' धी ' तत्त्व हे स्वयंभू प्रकाशयुक्त आहे अशी श्रद्धा निर्माण झाली. भारतातच नव्हे; हा सर्व भाषिकांचाही अनुभव असणार. ' भा–षा ' यात भानुप्रकाश: सवितृप्रकाशाची जाण प्रतिबिंबित झालेली दिसेल. ' धियो यो नः प्रचोदयात् ' अशी ज्याला प्रार्थना करावयाची, तो ' धी ' प्रेरक देव ( ज्ञानरूप ) प्रकाशाचा सूर्यसदृश सवितृ आहे असे मानले गेले ते निष्कारण नव्हे.

हे ' प्रकाशतत्त्व ' ; यामुळे, ' सविता ' हा दिवसाचा की रात्रीचा देव हा प्रश्नच अनाठाई ठरतो, वरील विचारसरणीत तथ्य असेल तर.

पण, वर विवरण केल्याप्रमाणे, ४–५ प्रकारानी हे ' सवितृ ' दैवत, सांकेतिक पातळीवरील ' प्रकाश ' स्वरूप दैवत आहे, असे ठरत असले तरी, श्री. हरीभाऊ रानडे यानी, ' सवितृचा दिवस व रात्र दोहोशी ' संबंध अगल्याचे टिपले आहे ( नवभारत जाने. ७४; पा. ४६ ); तेही खरे आहे ! पण–

४ ) ' सविता ' रात्री देवता ठरते, याचा अर्थ काय !

हा अर्थ समीक्षकांनी शोधावयाचा असतो; लादावयाचा नसतो. हा ' इति-हास ' : हे असे ( इति ) होते ( आस ) म्हणजे ही घटना निश्चित ( ह ) खरी असेल तर, गतकालाचा पडदा बाजूस सारला असता, तो इतिहासांश, स्पष्ट दृष्टिपथात आला पाहिजे.

प्रथम दिवसाचे असणारे दैवत रात्रीचे बनते; म्हणजे पूर्वीचा ' समय ' बदलतो; आचारातही फरक होऊ लागतो. या स्थित्यंतरामागील जीवनविषयक दृष्टिकोणही बदललेला असणार. संप्रदायातील हे फरक संभवण्यामागे, काही प्रभावशाली महान वर्चस्वी व्यक्ती असणार ! हे सारे जाणणे दुष्कर आहे; पण अशक्य नाही.

कोणत्याही संस्कृतीचे घटक हे तीन असतात. १ ) सांकेतिक प्रतिमांच्या दिशेनी, त्या सांस्कृतिक २ ) समयात ( cultural time ) प्रवेश मिळू शकतो; समसामयिक अशा निरनिराळ्या प्रतिमा व संकेतांच्या तुलनेत त्या संकेताच्या अर्थाभोवतीचे ' समय'रूपी आवरण निःसंदिग्धस्वरूपांत कळू शकते. हा ' समय ' निश्चित होईल तर, या समयातील आचारस्वरूपावरून या संस्कार, संस्कृतीचा प्रेरकवर्ग कोण, हे आपोआप कळणे शक्य आहे.

उदा. i ) देवताजननसूक्तांतील, मार्तंड ' नामानं सूर्यं ही प्रतिमा रात्री सूर्यं ( : चंद्र ) सूचक आहे (१०.७२ ८,९,) ii) अत्रीला ' गूळहं सूर्यं ' लाभला ( अविदन् ) या सिद्धीच्या वर्णनात ' स्वर्-भानु ' नामक सूर्यसदृश एका प्रतिमेचा निर्देश येतो (५.४०) ' स्वर्-भानु ' हा चंद्र ' राहु ' स्वरूपातला आहे, असे तज्ज्ञांचे मत आहे.

iii ) ' ऋत : सत्य ' ही सांकेतिक प्रतिमा, प्रथम ( सौर ) ' प्रकाश ' रूप दैवताशी संबद्ध आहे; अवेस्तात ' अष ' ( = ऋत : सत्य ) हे, प्रकाशरूप अहुर्मझ्दशी निकटवर्ती आहे. ऋत हे जीवनातील दिवस व रात्र या घटनेवर नियंत्रण करणारे वैश्वक नियम, ( universal paw ) व्यवस्था ( order ) सूचक संकेत होय असे मानले जाते. पण सबंध दिवसाचे हे तत्त्व फक्त रात्रीचे तत्त्व होताच, ऋतचे स्वरूप बदलते, ते आर्तव, रेत, आप, रस सूचक संकेत ठरते ! प्रकाशरूप तात्त्विक पातळीवरील घटना, भौत पातळीवरील सृजनाशी संबद्ध घटना होते !

iv ) ईशोपनिषदांत ' प्राजापत्य सूर्य ' येतो ! ( १६ ) हा ' प्रजापति ' हिरण्यगर्भ देवच असणार ! हे ' हिरण्यगर्भ ' दैवत ' यज्ञ, ' मुळात रात्रीशी संबंधित आहे. हा ' हिरण्यगर्भ ' दैवत ' यज्ञ ' मुळात रात्रीशी संबंधित आहे. चांद्रसंप्रदाय ठरतो. ' चंद्रोपस्थानातील ' हा अनुभव ' सवितृ '> सावित्रीवर लादला जातो !

ही सवितृ देवता. रात्रीची सांकेतिक प्रतिमा होताच यातील गुह्यार्थ, ' प्राजापत्य सूर्य ' प्रतिमेशी सुसंगत असाच झाला असला पाहिजे. याची खात्री पटायला दूर जाण्याची आवश्यकता नाही : वेदोपनिषत् कालीन शिष्टमान्य निरुक्तावरून हे कळेल. ' सवितृ ' दैवताच्या या वर्णनात वक्रोक्तीचा परमोच्चबिंदु साठल्याची खात्री पटेल, अशी आशा आहे; प्राज्ञानी निर्णय द्यावा.

१ ) सर्वस्य प्रसविता सविता ! प्रकाशदायक दैवत प्रसूतिवैशिष्टय – युक्त बनते !

अनुक्रमणिका

२) सविता वै प्रसवानां ईशे (ऐ. १. ३०)

३) सविता वै देवानां प्रसविता (श. ब्रा. १. १–३,६)

पण ऋग्वेदातील 'अदिती' ही 'विश्वजननी देवानां माता' असल्याची वर्णने आहेत! देवताजननसूक्तातील देवी 'सलिल' रूपी अदितीच आहे! म्हणून, 'देवानां प्रसवित्री' ही 'सविता' म्हटले तरी खरोखरी अदितीच असणार! अदितीला 'चमस' (पान पात्र) चंद्ररूपी म्हटलेले ऋग्वेदात आढळते (I. १६१).

श्री. हरीभाऊ रानडे यानी सुचविलेल्या ऋग्वेदीय उल्लेखात सुद्धा श्लेषार्थाखाली दडविलेला अर्थही, 'हिरण्यगर्भ' दैवतसंप्रदायाशी सुसंगत असल्याचे दिसेल;

या (I. ३५.) सूक्ताच्या ऋषीचे नाव आहे: 'हिरण्य–स्तूप (स्तंभ)! या सूक्तातील, 'रात्री' समयाचारासाठी आह्वानित दैवतात 'वरुण' आहे. या वरुणाला 'वनस्य ऊर्ध्वस्तूप' असे पर्यायी नाव आहे (I. २४.७). हा वरुण 'ऊर्ध्वमूल' (अश्व-त्थ) वृक्ष = स्तंभ, (अथर्ववेदातील स्कंभ) देव झाला! या स्तंभदेवा समवेत, 'सविते'ला रात्रीसाठी अगत्याचे आमंत्रण आहे! या सूक्तातील "सवितुः देव्यस्य उपस्थे विश्वाभुवनानि तस्थुः" (५). ही शब्दप्रतिमा, ही देवी 'सर्वस्य प्रसवित्री' कशी हे या ऋग्वाक्यावरून कळू शकेल. श्री. रानडे यानी 'स्कंभ' देवमाहात्म्य तपासले तर हे 'सावित्री' महाकाव्य रहस्य लक्षात येईल अशी आशा आहे.

'ऊर्ध्वमूल स्तूप' वरुण, = ऊर्ध्वमूल अश्वत्थवृक्ष कृष्ण-विष्णु वेगळे नव्हेत. 'वरुणो यादसां अहं' असे 'भग-वत' गीतेचा, भव-वान् सांगतो यात औचित्य आहे. 'मया अधि अक्षेण* सूयते सचराचरं' पण हा 'सर्वस्य प्रसवित्री' सावित्रीचा (की राधेचा) पती असे सूचित केले जात आहे! काळा कृष्ण प्रकाशरूप सवितृ-पती! अंधाराचा (कृष्णाचा) अनुयायी अर्जुन (प्रकाश) ही वक्रोक्तीही (कृष्ण) सर्प– सूर्य संगमाइतकीच काव्यमय आहे. ऋग्वेदात 'सर्प राज्ञी सूर्यो वा' ही 'वा न वा' किती तऱ्हेनी आविष्कार पावते, हे पाहणेसुद्धा उद्‌बोधक होणार आहे. प्रकाशरूप 'सवितृ' सूर्य [O] संकेत विश्वप्रसवाच्या प्रतिमा करण्याची ही यातु ऋग्वेदातच दडली आहे; 'वरुण' सूक्तात आढळण्यांतील मार्मिकतेकडे दुर्लक्ष न व्हावे, म्हणून हे

---

* येथे अक्ष (axcel) स्तूप, वृक्ष, स्तंभ, स्कंभ हे समानार्थी होत.

सुचवणे अवश्य वाटते. आणि ही सूक्ते ‘दक्षिणकपर्द’, ‘शिपिविष्ट’ रूपी विष्णु उपासक वसिष्ठकुलाची होत. ‘ऊर्ध्वबुध्नवनस्यस्तूप’ ‘वरुण’ सूक्तांत ( VII. ८९, १०० ) ‘शिपिविष्ट’ विष्णूदैवत येण्यातील अंतःसंगती, भगवद्गीतेच्या ‘ऊर्ध्वमूल’ वृक्षरूपी विष्णु–कृष्ण, आणि वनस्यस्तूप वरुण हे एकच होत, या वाक्याने उजेडात येईल.

अशा, या वसिष्ठकृत हे सूक्त पाहा ( VII. ६३ ). प्रजाप्रसवक सूर्योदयाचे हे वर्णन आहे ‘उद्वेति प्रसविता जनानां महान् अर्णवः ..’ या वर्णनांतील ‘अर्णव’ या समुद्र. (ऊर्मीयुक्त) सूचक संकेताला बळकटी आणणारी ‘चक्रा’ची प्रतिमाही एक येते. ही सौरप्रतिमा, वृत्त ( O ) आकृतीची आहे हे येथे सूचित करण्याचा उद्देश दिसतो. या पेक्षा ही बोलकी प्रतिमा म्हणजे याच सूक्तातील ‘चक्षुः’; पहिल्या ऋचेत ‘सूर्य’ हा विश्वचक्षु आणि वरुणाचा ‘चक्षु’ म्हटले आहे. वरुणाचे स्तंभ ( । ) स्वरूप लक्षात घेतले तर, सूर्य ( O ) हा या स्तंभाचे अधि-स्थान ( O ) ठरते! ‘वरुण’ – ‘वारुणी’, वारू अश्वनामही होय. हय (ग्रीव) विष्णु = वरुण हे साम्यही लक्षात घ्यावे. वरुण ( = अश्व ) आणि वरुणाचा चक्षु O उभा राहतो ते स्थल = स्थ = त्थ ) सूर्य. ही अशा प्रकारे अश्वत्थ : वृक्षही गीतेतील विवस्वन्सहित सावळ्या कृष्णाची संपूर्ण प्रतिमा होत आहे!

भगवान श्रीकृष्णाचे, ‘सु-दर्शन चक्र’ हे सूर्याचे प्रतीक असल्याचे श्रे. गोंडासारखा तज्ज्ञ सांगतो, म्याकडोनेलही नमूद करतो.

वेद, पंचमवेदादि, ग्रंथातील हे सौरप्रतिमाविडंबन संशयास्पद राहू नये ही दक्षता संप्रदायात घेण्यात आली आहे सूर्य-नारायण ( = सर्प = वृक्ष = अश्व = स्तंभ ) दैवतांचे मिथुनयोगातील दर्शन नित्य घडविण्याची योजनाही आपल्या संप्रदायात आहे. प्रातःस्मरणीय या सूर्य-नारायण प्रतिमेत आक्षेपार्ह असे आहे काय? ‘संशयात्मा विनश्यति’ भलत्या ठिकाणी भलते संशय घेणे श्लाघ्य होईल काय? पण पुढील श्लोकाचा अर्थ काय? सूर्य आणि सविता यांची दिवसाचे देव ही मर्यादा राखून, केलेले हे वर्णन चिंत्य आहे; अशा या जीवनादर्श ‘संपृक्तौ जगतः पितरौ’ सूर्य-नारायण उपासनेचा प्रभाव, आज जगावर सर्वत्र, उघड दिवसाही दिसू लागला, तर आश्चर्य का वाटावे? सूर्य नमस्काराच्या साधनेत अशी प्रार्थना आहे :

ध्यायेत् सदा सवितुःमंडल ( O ) मध्यवर्ती
नारायणः, सरसिजासन्निविष्ठः।

हा नाग-नारायण आहे; हा विष्णु ( शिपिविष्ट ) रूपी कृष्ण : विटेवरी उभा ' पांडु ' ( शुभ्र ) रंगी देव आहे. ' चंद्राः आपः ' चंद्रभागा नित्य स्त्रवती आहे. ... ...

' चक्षुः * ( O ) वै सत्यम् ' हे वेदोपनिषद् वाक्य अक्षरशः खरे काय ? छेः ! ' सत्य ' साक्षात्कार घडविणारा हा ' दिव्य चक्षु ' शुद्ध सांकेतिक पातळीवरचा ! गुरुकृपेशिवाय ' तत्–मय ' सिद्धी मिळत नसते ! पण ही कृपा गुरुदेवाची ? की– गुरुदेवीची ? केनोपनिषदात दिव्यज्ञानदीक्षा देणारी ' गुरुदेवी ' असून ती ' उमा हैमवती ' नावाने प्रसिद्ध आहे ! ऋग्वेदातील वागांभृणी देवी म्हणते ' यं कामये तं उग्रं कृणोमि; ब्रह्माणं, ऋषिं ' सुमेधसं कृणोमि ! ( ऋ. १०.१२५ )

पण या दोनी गुरुदेवींनाही ' सविता ' देवी म्हणता येत नाही ! हैमवती– हिमवत् ' पर्वती ' : अंभृणी तर, ' अप्सु अंतःसमुद्रे ममयोनिः ' मी अंतःसमुद्रातून जन्मले म्हणून सांगते. ' सरस्वती ' नामक विद्यादेवी वेदात येते; वसिष्ठ हा ' सरस्वती ' उपासक होता, ही रसवंती ' नदी ' रूपात वर्णिली गेली आहे !

या पूर्व परंपरेवरून वेदकाली, ज्ञानोपलब्धीकरता ' सरस्वती ', ' अम्भृणी ' ' उमा ' अशा ' मध्यमा ' ( medium ) वाक्देवींची उपासना करणारा संप्रदाय एक असावा. ( ग्रीसकडील डेल्फी भाकित सांगणाऱ्या कुमारी संप्रदायाचे साम्य येथे असावे ); आणि हा ' गुरुशरण ' मार्ग आहे; तर शिष्यात् इच्छेत् पराजयं ' या विमर्शन संप्रदायात ' प्रकाश ' तत्त्वाची ' सवितृ ' ( : सूर्य ) उपासना प्रचलित असावी लागते !

५) इतिहासाची साक्ष पाहा

ही भारतीय कृष्ण-विष्णु परंपरा, तत्पूर्वीची वरुण ( मित्र ) परंपरा या शाक्त संप्रदायाच्या पार्श्वभूमीवर वाढलेल्या दिसतात. हा चांद्रसंप्रदाय होता, हे प्रतीतीस आणून देणारे विविध प्रकारचे पुरावे उपलब्ध होत आहेत.

ख्रिस्त ( हिब्रूपंथही ) संप्रदाय, कृष्णपंथाप्रमाणेच, तत्पूर्वीच्या, ओर्फ्यूअस्, एल्यूशियन, डायोनेशिअन् अशा निरनिराळ्या वाटणाऱ्या शाक्त : चांद्रपूजाप्रकारांच्या पार्श्वभूमीवरच आकार घेतो.

* ही ' चक्षु ' देवी सुमेरकडे होती भारतातील ' नैना ' (हिमालय प्रदेश) तिकडची होय. डि. जि. एस. क्राफर्ड याने ' The Eye Goddess ' हा ग्रंथ स्वतः संशोधनकरून, अनेक संशोधकांचे आधार देऊन लिहिला आहे. जिज्ञासूनी पाहावा. Mack Millan & co.

'प्रकाश' तत्त्वपूजकांचा संप्रदाय चांद्रपरंपरेपेक्षा खूपच अर्वाचीन आहे. संस्कृत व अवेस्ता भाषिकाकडून ( यात ग्रीकचाही समावेश होतो. ) 'प्रकाश' देवतातत्त्वविचार प्रकट झाल्याचे दिसते. ( ख्रि. पू. २५०० सुमारे ). तत्पूर्वी ही स्पष्टता नव्हती. आप: रस– 'चांद्र' माध्यमातूनच आशय व्यक्त केला जात असे. 'ज्ञान' देव = एंकी (सुमेर) आपस्वरूपीच आहे; पण पुढील टप्यात 'ज्ञाना'चे माध्यम आप: रस होण्यात उणीव रहाते, हा अनुभव आल्यावर 'प्रकाश' हे ज्ञान माध्यम झालेले दिसते. पण चांद्रसंप्रदायाला ( रात्री उपासकाना ), 'प्रकाश' रूप दैवतपूजा आपल्या प्रतिष्ठेला, अस्तित्वालाही बाधक असल्याचा अनुभव येऊ लागला असावा हे उघड आहे. पण हा फक्त तर्क, असे म्हणावयास जागा नाही. भारतीय परंपरेतील 'सत् एव इदं अग्रे आसीत्' 'एकं एव अद्वितीयं' या ईर्षेची, स्पर्धेची ही गर्जना, प्रतिस्पर्ध्याविना अर्थविहीन आहे ! आणखी एका दिशेनेही याची खात्री पटेल :

भारतीय संप्रदायातील सौर संप्रदायाच्या प्रतिमांचे विडंबन, त्या संप्रदायाला हार खावी लागल्याची साक्ष देते : केनोपनिषदातील 'जातवेद' अग्नीचे विडंबन आहे; वृत्रहन् महापराक्रमी म्हणविणारा इंद्र पराजित होऊन, उमाहैमवतीकडून ज्ञानदीक्षा घेतो अशा तऱ्हेचे चित्र पाहावयास मिळते. या उपनिषदापूर्वीच, ऋग्वेदात वागांभृणी म्हणते, 'इंद्राग्नीं बिभर्मि-पोसणारी मी ! अशाप्रकारे, 'जातवेद' अग्नी-धीदैवत सवितृ आदि हे दैवत प्रतिमाभंजन मुसलमानांच्या आगमनापूर्वीचे कृत्य आहे ! इस्लामी आततायींनी, हिंदू ' जैनादींच्या प्रतिमा फोडल्या, म्हणून आक्रोश केला जातो. त्या दगडी मूर्ती; पण ज्ञानस्वरूप 'प्रकाश'तत्त्व भंजनाने आज भौतसूर्य असूनही 'तमः आसीत् तमसा गूळहं' अंधाराला अंधार आ-लिंगन देत असल्याचे दृश्य जगावर नंगानाच करीत आहे ! याला जबाबदार कोण ?

भारताप्रमाणे ग्रीस देशाकडेहि 'प्रकाश' तत्त्वदैवतांची प्रतिष्ठा वाढू लागल्याचे दिसते. झेअस ( द्यौः ) सारखा देव, विष्णुसारखा 'सर्वतंत्र स्वतंत्र' नव्हता, तो नियंत्रित होता असे त्या संस्कृतीचे व्यासंगी सांगतात. शिवाय ख्रिस्त संप्रदायाचे इतिहासकारकच सांगतात की ( Testament legends that) the influnce of persian (Avestun) thought upon it would seen beyond dispute ( Mithras, By E. Wynne Tyson, p. 38 ). क्रिस्तप्रतिमा चितारताना, त्याच्या मुखाभोवती (सूर्य) तेजोवलय दाखवण्याची प्रथा सौरप्रभाव द्योतक असल्याचे जाणकार ख्रिस्तपंथीयच सांगतात. मांडीवर बालख्रिस्त घेऊन बसणाऱ्या मातेची प्रतिमा,

इजिप्तच्या होरसला स्तनपान करीत असलेल्या इसिसमातेची नक्कल आहे असे अनेक प्रमाणे देऊन प्रतिपादिले जात आहे. ( Isis in Greecs Roman World, By R. E. Wilt Cornell University Press, 71. ).

इजिप्तचा हा होरस, 'Bull of his mother' म्हणून हा अदिति दक्ष ' कथेतील 'दक्ष ' आहे– हा मुळात चांद्र असून सूर्य सदृश झाल्याची चित्रेही आढळतात. वेदांतील विश्वप्रसवचक्षुः सूर्य, या प्रतिमाशी जुळती मिळती प्रतिमा इजिप्तच्या ( Re ) 'रा ' दैवत चक्षूची आहे ! वरुण हा सम्राट राजन् होता. हा वरुण सूर्य 'चक्षू ' होता म्हणून वरुणाचे सम्राट् राजत्व होते. पण, ही सूर्य ( सवितृ ) विवस्वन्ची प्रतिमा विष्णु-कृष्णाची होते ! 'वरुण ' पदभ्रष्ट होतो. पण पाश्चात्यांना 'इद्राने ' वरुणाला पाडले असे वाटते ! गीतेत कबूली असूनही ! ही 'विष्णुमाया ' होय ! वरुणानंतर हिरण्यगर्भ प्रजापती त्या जागी आल्याचे म्याकडोनेल टिपतो. या पुढे विष्णु-कृष्णाकडे सम्राट् राजपद येते. 'नाऽविष्णुः पृथिवी पतिः ' सम्राट्-राजन् ही पदवी, 'भग-वान् या नूतन रूपात दिसू लागते. देवी इसिस = राजाचे आसन ( : Trone ) ! हे समीकरण इजिप्त संस्कृतीतच ठरले गेलेले दिसेल, * 'पद्म ' ( = पद्मावती श्री लक्ष्मी ) या सांकेतिकतेत कमलासनी : भगवंत कसा व का, याची उकल आढळेल. पद्मासनी बुद्धही 'भगवान ' होय.

भारतातील सर्प ( : चंद्र ) व सूर्य या सांकेतिकतेचे पडसाद ( आगे मागे कोठले हा भाग सोडून ) इतिहासात इजिप्त संस्कृतीतही आढळतात ते, हा काकतालीय न्याय म्हणावयाचा ? किंवा हे साम्यच संभ्रामक म्हणून उडवून टाकावयाचे हे तज्ञानी ठरवावे.



---

* 'The Eye, Symbol of Kingship ' p. 89, Mythologies of the Ancient World Anker Books N. Y आणि हा डोळा, सूर्य असे भासविले जात असले तरी सूर्य नव्हे, असे स्पष्ट ठरले आहे. p. 89 90

डॉ. सु. बा. कुलकर्णी

# द्राविड भाषा परिवार*

## ( पूर्वार्ध )

### द्राविड भाषा आणि आपण

सर्वसाधारण मराठी माणसाच्या समजुतीप्रमाणे दक्षिण भारतात 'मद्रासी' किंवा 'कानडी' माणसे रहातात! त्यांची भाषाही मद्रासी किंवा कानडी असते. अधिक चोकस व्यक्तींच्या गणनेत दक्षिणेतील चार राज्ये– तामिळनाडु, आंध्रप्रदेश, कर्नाटक व केरळ: त्याचप्रमाणे त्या त्या राज्यात बोलली जाणारी भाषा– तमिळ, तेलुगु, कन्नड व मलयाळम यांचा अंतर्भाव होतो.

मराठी भाषेच्या अभ्यासकांस यादवकालीन कानडी–मराठी संबंधाची कुणकूण लागलेली असते. मराठीने आडकित्ता, परात, तपेले, गुंडी, बंडी, नथ, सरी, पाटली, पोळी, फडबोळी, आप्पा, आण्णा, आक्का, इ० शेकडो शब्द-मंडळी घरजावई केल्याचे त्यांच्या लेखी असते. 'मऱ्हाष्ट्र. लाट आणि कर्णाट' यांच्या सांस्कृतिक आणि ऐतिहासिक संबंधांचा अभ्यास करणारांस सातवाहन, राष्ट्रकूट, होयसळ, गंग, चालुक्य, संगम, यादव, बहमनी, आदिलशाही, निजामशाही इ० राजवटींत महाराष्ट्र व आंध्र-कर्नाटक यांचा परस्परांशी आलेला घनिष्ठ संबंध ज्ञात असतो. उभ्या महाराष्ट्राच्या हृदयस्थानी विराजमान झालेला कानडा विठ्ठलु 'करणाटकु' आहे याची जाणीवही काहीजणांना असते. वि. ल. भाव्यांच्या सारस्वताच्या आधारे सतत ऐंशी वर्षे पडलेल्या दुर्गादेवीच्या भीषण दुष्काळाची करुण कहाणी, महाराष्ट्राची वाताहात, आंध्र-कर्नाटकाने दिलेला आश्रय व त्या कारणाने झालेली भाषिक व सांस्कृतिक देवघेव यांची माहितीही अनेकजणांनी करून घेतलेली असते.

परंतु या सगळ्या झाल्यागेल्या गोष्टी इडलीडोसा, वडासांबार, उपमा, उप्पीट इ० उडपी पदार्थांची नावे ऐकताच आज आमच्या जिभेला

---

* प्रस्तुत निबंधातील आकडेवारी १९६१ च्या भारतीय जनगणनेवर आधारलेली आहे.

अनुक्रमणिका






पाणी सुटते. 'बेळगाव सीमावाद' व 'दाक्षिणात्यांचे मुंबईवर आक्रमण' या विषयांचे हाडूक तर आम्ही मोठ्या चविष्टपणे चघळतो एकाद्या मडक्यात खडे घालून ते जोरजोराने हलविल्यास जो ध्वनी निघतो ती कानडी भाषा, हा तर आमचा पेटंट जोक आहे. रुंडुगुंडुकुंडूची सोंग रंगभूमीवर आणून आमच्या नाटककारांनी करमणुकीची सोय तर केलीच आहे शिवाय आमच्या अभिजात अभिरुचीची बोलकी जाहिरातही केली आहे. राष्ट्रीय एकात्मतेच्या लंब्याचवड्या गप्पा मारण्यात तर आमची सर कोणालाच येणार नाही. पण एक गोष्ट मात्र आम्हाला जमत नाही, ती म्हणजे इंग्रजी व हिंदीशिवाय एकादी भारतीय भाषा शिकणे. आमच्या दाक्षिणात्य शेजाऱ्यांच्या भाषेतील चारदोन शब्द लक्षात ठेवण्यापलीकडे आमचे भाषिक औत्सुक्य पुढे जात नाही.

आज महाराष्ट्रात ३ कोटींवर मराठी भाषिकांबरोबर १० लक्ष हिंदी भाषी, १० लक्ष गुजराती भाषी व त्यांच्या खालोखाल ६ लक्ष ३० हजार कन्नडभाषी व ६ लक्ष २४ हजार तेलुगुभाषी लोक रहात आहेत. याशिवाय प्रत्येकी २ लक्षांवर सिंधी, उर्दू, मारवाडी, कोकणी भाषा बोलणारे आहेतच. कन्नड आणि तेलुगूखेरीज १ लक्ष ५९ हजार तमिळभाषी, ९० हजार मलयाळमभाषी व ११ हजार तुळुभाषी असे प्रमुख द्राविड भाषा बोलणारे लोक आहेत. या पाच द्राविड भाषांच्या भाषिकांची संख्या १५ लक्षाहूनही अधिक होते. एवढेच नव्हे. तर महाराष्ट्रातील गोंड, कोलाम, परधान, नाईक, वडार, कोमटी, कैकाडी, होल्ये इ० आदिवासी बांधवांच्या भाषाही द्राविड आहेत.

महाराष्ट्रातील बहुसंख्य कन्नड भाषिक सीमाप्रदेशातील सोलापूर, कोल्हापूर, सांगली, उस्मानाबाद या जिल्ह्यांत व मुंबईत रहातात. सोलापूर जिल्ह्यात सर्वाधिक, म्हणजे २ लक्ष १३ हजार कन्नड भाषिक आहेत. त्यानंतर कोल्हापूर ( १ लक्ष २० हजार ) व सांगली ( १ लक्ष ८ हजार ) यांचा क्रमांक लागतो. मुंबईत ८३ हजार कन्नड भाषिक आहेत. सीमाप्रदेशात कन्नड व मराठी द्विभाषी लोकांची संख्या साहजिकच अधिक आहे. महाराष्ट्रातील २ लक्ष ६१ हजार कन्नड भाषिकांना मराठी भाषा येते. परंतु भारतीय पातळीवर कन्नड जाणणारे मराठी भाषिक १ लक्ष ६० हजार इतकेच आहेत व तेही बहुसंख्येने सीमाप्रदेशातील आहेत.

महाराष्ट्रातील तेलुगु भाषिकांचे केंद्रीकरणही सीमाप्रदेशातील जिल्ह्यांत व मुंबईत आढळते. सोलापूर (१ लक्ष ४ हजार), चांदा ( ९५ हजार ), नांदेड ( ६७ हजार ), पुणे ( ४० हजार ) व मुंबई ( ९७ हजार ) या प्रदेशात ते

बहुसंख्येने आढळतात. महाराष्ट्रातील २ लक्ष ८ हजार तेलुगु भाषिकांची मराठी ही दुय्यम भाषा आहे. परंतु भारतीय पातळीवर फक्त ४६ हजार मराठी भाषिक तेलुगु जाणतात.

तमिळ भाषिकांचे केंद्रीकरण प्रामुख्याने मुंबई ( १ लक्ष ४ हजार ) व पुणे ( २६ हजार) या शहरातून आढळते. महाराष्ट्रातील ७ हजार ७ शे तमिळभाषी मराठी जाणतात; परंतु भारतीय पातळीवर फक्त ९५५ मराठीभाषी तमिळ जाणतात.

मुंबईत ६६ हजार मलयाळम भाषिक व १० हजार तुळु भाषिक आहेत. २३ शे मलयाळमभाषी मराठी जाणतात. तर मलयाळम जाणणारे मराठीभाषी फक्त ६८ आहेत !

ही आकडेवारी आमच्या अन्य भारतीय भाषांसंबंधीच्या व तदनुषंगाने अन्य भारतीय समाज व संस्कृती यांविषयीच्या आस्थेची व औत्सुक्याची द्योतक आहे ! ही झाली साहित्यसंपन्न नागर भाषांची कथा. महाराष्ट्रातील आदिवासींच्या द्राविड भाषा आम्हाला समजत तर नाहीतच; परंतु त्यांचा परिचय करून देणारे चोपडेही आज आम्हाला उपलब्ध नाही. भारतामध्ये एकात्मता, बंधुभाव निर्माण करावयाचा असल्यास त्यास भाषेइतके प्रभावी माध्यम नाही. अन्य समाजाच्या अंतरंगात शिरण्यास भाषेची कवाडे खोलली पाहिजेत, नव्हे, सताड उघडी टाकली पाहिजेत. शासकीय पातळीवर जोरदार मोहीम उघडली पाहिजे. भारतीय भाषाभगिनींचा परिचय करून देणारे साहित्य निर्माण झाले पाहिजे. कमीअधिक कालावधींचे विविध भाषांचे अभ्यासक्रम तयार झाले पाहिजेत. असे अभ्यासक्रम पुऱ्या करणाऱ्या शाळा खाजगी व शासकीय पातळीवर स्थापन झाल्या पाहिजेत. भाषा–भाषांचे छोटेमोठे कोश व व्याकरणे तयार झाली पाहिजेत. भाषिक प्रयोगशाळा स्थापून अल्पावधीत परभाषा–शिक्षण कसे द्यावे याचे मार्गदर्शन झाले पाहिजे. याच प्रेरणेने प्रस्तुत निबंधात द्राविड परिवारातील भाषांचा परिचय करून दिलेला आहे.

## भारतीय उपखंडातील भाषिक परिस्थिती

विद्वज्जगतात दक्षिण आशिया या नावाने परिचित असलेल्या भारतीय उपखंडात भारत, पाकिस्तान, नेपाळ, बंगलादेश व श्रीलंका असे पाच स्वतंत्र देश मोडतात, नाना प्रकारची हवामाने, नाना तऱ्हेचे भूखंड व प्रस्तर, नाना धर्तीचे जलाशय, नाना रंगाचे–नाना आकारांचे पशुपक्षी, कीटक, जलचर, वृक्षवल्लरी, नाना वंशांचे, धर्मांचे, संस्कृतींचे व भाषांचे लोक अशा विविध

अंगोपांगांनी नटविलेला हा एक अजबखानाच आहे. भौगोलिक, धार्मिक, सांस्कृतिक, वांशिक इ० वैविध्यांनी युक्त असूनही येथील मानवसमाजात अनन्यसाधारण अशी एकात्मता वास करीत असते. नाना वंशांचे, धर्मांचे, भाषांचे, संस्कृतींचे लोक प्रागैतिहासिक काळापासून या उपखंडात वसाहतीस येत राहिले, शेजारीशेजारी राहू लागले, परस्परांशी देवाणघेवाण, रोटीबेटी व्यवहार करू लागले, क्रियाप्रतिक्रिया झाल्या आणि या सर्वांचा परिपाक म्हणजे आजचे एकात्म असे भारतीय लोकजीवन.

भाषिक दृष्टिकोनातून भारतीय उपखंडातील समाजांचे चार मोठे गट कल्पिता येतात. यांतील सर्वांत मोठा गट म्हणजे संस्कृतोद्भव आर्यभारतीय परिवाराच्या भाषा बोलणाऱ्यांचा होय. मराठी, गुजराती, हिंदी, उर्दू, पंजाबी सिंधी, बंगाली, आसामी, उडिया, नेपाळी, सिंहली इ० सुमारे पाऊणशे लहान-मोठ्या भाषा या परिवारात मोडतात. काश्मिरी ही दार्दिक गटातील भाषाही या परिवारास जवळची होय. भारतीय उपखंडातील लोकवस्तीचा जवळजवळ पंचाहत्तर टक्के भाग या भाषांच्या भाषिकांनी व्यापलेला आहे. उर्वरित पंचवीस टक्के भाग द्राविड, ऑस्ट्रोएशियाटिक व तिबेटोबर्मी परिवारांतील भाषांच्या भाषिकांनी व्यापलेला आहे.

१९६१ च्या भारतीय जनगणनेमध्ये निव्वळ भारतात बोलल्या जाणाऱ्या १६५२ मातृभाषांची ( बोली ) नोंद झाली आहे. यांतील अवर्गीकृत व परदेशीय मातृभाषा वगळून राहिलेल्या मातृभाषांची विभागणी सुमारे २०० भाषांत करता येते.

भारतातील भाषा-परिवार व भाषिक

| परिवार | भाषा | भाषिक | शेकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| आर्यभारतीय | ६६ | ३२१, ७२०, ७०० | ७३.३० |
| द्राविड | २५ | १०७, ४१०, ८२० | २४.४७ |
| ऑस्ट्रोएशियाटिक | २० | ६, १९२, ४९५ | १.५० |
| तिबेटोबर्मी | ९८ | ३, १८३, ८०१ | .७३ |

## प्रागैतिहासिक भारतीय समाज व त्यांच्या भाषा

चार हजार वर्षांपूर्वी या उपखंडात कोणते लोक रहात व ते कोणत्या भाषा बोलत यासंबंधी आज निश्चित विधान करता येत नाही. अनुमाने अनेक असली तरी पुरातत्त्व, मानवशास्त्र व भाषाविज्ञान यांच्या समाधानकारक कसोटीस ती उतरत नाहीत. भाषाभाषांतील शब्दांमधील ध्वनी व अर्थ यांच्या

अनुक्रमणिका

साम्यातील नियमितता असे सुचविते की भारतीय भाषांची व तदनुषंगाने अधिकांश भारतीय समाजांची मूलस्थाने या उपखंडाबाहेरील आहेत.

इ. स. पू. दुसऱ्या सहस्रकात आर्यांनी जेव्हा वायव्य व उत्तरेकडून या भूप्रदेशात प्रवेश केला तेव्हा द्रविड ( दास-दस्यु ), मुंडा ( निषाद ), तिबेटी ( किरात ), भिल्ल, इ० लोकांच्या संस्कृती येथे नांदत होत्या आणि आजही नांदत आहेत. भारतातील संताळी, मुंडारी, हो, कोरकू, खडिया, सोरा, इ० मुंडा भाषा, खासी व निकोबारी या पश्चिमेकडील ऑस्ट्रोएशियाटिक भाषा होत. या भाषांचा संबंध आग्नेय आशियातील मॉनख्मेर व अतिपूर्वेकडील ऑस्ट्रोनेशियन भाषांशी दिसून येतो. यावरून मुंडा जमातींचे लोक पूर्व दिशेने भारतात वसाहतीस आले व मध्यहिंदुस्थानपर्यंतच्या प्रदेशात स्थायिक झाले असे अनुमान निघते. यांच्याही अगोदर पूर्व व ईशान्येकडून आलेले व नंतर अनेक शतके येत राहिलेले तिबेटी व बर्मी हे मंगोलियन वंशाचे लोक आसाम, मेघालय, अरुणाचल व हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशात स्थायिक झाले. जगातील कोणत्याही भाषेशी नियमित साम्य दाखवीत नसल्याने अंदमानी व बुरुशस्की ( उत्तर कश्मीर ) या भारतीय भाषा अवर्गीकृत राहतात व भाषिक आधारावर त्यांच्या समाजांचा पूर्वेतिहास आपणास कळू शकत नाही. भिल्लादी पश्चिम भारतीय वन्य समाजांच्या भाषा आज जरी आर्यभारतीय परिवारात मोडत असल्या तरी त्यांच्या संरचनेत व शब्दांच्या मुळाशी आढळणारा एक स्तर प्रचलित भारतीय भाषांशी संबंध नसलेला असा आहे. यावरून भिल्ल, कोकणे, कातकरी, ठाकूर, वारली, मावची फासेपारधी इ० पश्चिम भारतीय वन्य जमाती व नीग्रिटो ( अंदमानी ) हे प्रागैतिहासिक भारताचे ज्ञात असे आदिम निवासी म्हणता येतील.

द्रविडांच्या भाषांचे साम्य फिनो-उग्रियन भाषांशी आढळत असल्याने त्यांचे मूलस्थान पश्चिम आशियातील उरल पर्वताच्या आसपास असावे असे अनुमान आहे. प्रमुख द्राविड भाषांच्या प्रदेशापासून दूरवर बलुचिस्थानात बोलल्या जाणाऱ्या ब्राहुई या द्राविड भाषेने या अनुमानास पुष्टी मिळते. मोहेंजोदडो, हडप्पा व लोथल येथे सापडलेल्या लेखांचे साधर्म्य द्राविड धातुमूळाशी दाखविण्याचा प्रयत्न काही संशोधकांनी केलेला आहे. या आधारावर तेथील संस्कृतीचे लोक द्रविड असावे असा तर्कही केला जातो. परंतु या लेखांचे शास्त्रपूत व सर्वमान्य वाचन अजून झालेले नसल्याने या संस्कृतीच्या लोकांविषयी निश्चित विधान करणे धाडसाचे ठरेल. एकात्म अशा भारतीय संस्कृतीच्या जडणघडणीस द्रविड लोकांनी मोठा हातभार लावलेला आहे. भटक्या आर्यांना नागरी जीवनाची वाट त्यांनीच दाखविली. कर्म, पुनर्जन्म इ० कल्पना;

शिव, विष्णू, व देवी या देवतांविषयीचे तत्त्वज्ञान; होमहवनाऐवजी पूजाअर्चा; योग व सिद्धी इ. अनेक बाबतीतील कल्पना व आचरण आर्यांनी द्रविडांपासून उचलले. भाषिक देवघेव तर वेदकालापासूनच चालू असलेली दिसते. वैदिक वाङ्मयात आढळणारे अगस्त्य, कुंड, कांड, कुणप, नाक्र, बिल्व, इ० अनेक शब्द द्राविड आहेत. आर्यभारतीय भाषांतील मूर्धन्य वर्णाचा उगम द्राविड भाषात शोधावा लागतो द्राविड भाषांनी केलेले संस्कृत शब्दांचे ऋण तर इतके प्रचंड आहे की त्या भाषा संस्कृतोद्भव आहेत असे म्हणणारे संशोधक निघाले !

## प्रचलित द्राविड भाषा परिवार

द्राविड परिवारात एकूण २५ भाषा आहेत. त्यांच्या भाषिकांची एकूण संख्या १०७, ४१०, ८२० असून भारतीय पातळीवर शेकडा २४.४७ टक्के एवढी पडते. या परिवारात तमिळ, तेलुगु, कन्नड व मलयाळम या चार मोठ्या भाषा असून त्यांचा भारतीय संविधानाच्या आठव्या परिशिष्टामध्ये अंतर्भाव करण्यात आलेला आहे. या चार भाषा बोलणाऱ्यांची संख्या— १०२, ६६२, ४४७ एवढी असून या परिवाराच्या एकूण भाषिकांच्या संख्येच्या शेकडा ९५.५८ टक्के एवढी आहे. द्राविड परिवारातील या चार भाषा प्रामुख्याने दक्षिण भारतातील चार राज्यात बोलल्या जातात व त्या त्या राज्यातील शासनव्यवहाराच्या माध्यम आहेत. यांतील तमिळ ही तामिळनाडूत, तेलुगु ही आंध्रप्रदेशात, कन्नड ही कर्नाटकात, तर मलयाळम ही केरळात बोलली जाते. ग्रियर्सनच्या भारतीय भाषा सर्वेक्षणात पूर्वीचा मद्रास इलाखा, हैद्राबाद, म्हैसूर, त्रावणकोर इ. संस्थाने यांचा समावेश न झाल्याने या भाषांच्या प्रादेशिक विस्ताराचे व वैविध्याचे आपणास पद्धतशीर ज्ञान झालेले नाही. ग्रियर्सन नंतर कोनो, सुब्बय्या, रामस्वामी अय्यर, ब्लॉक, बरो, एमेन्यू, कृष्णमूर्ती, मीनाक्षीसुंदरम्, इ. शेकडो संशोधकांकडून या भाषांचे जे थोडेबहुत अध्ययन झालेले आहे, त्याच्या आधारे आपणास या परिवाराच्या भाषा भौगोलिक दृष्टिकोनातून तीन गटात विभागता येतात :

दक्षिण द्राविड : तमिळ, मलयाळम, तोडा, कोटा, कन्नड, बडगा, कोडगु ( कूर्गी ), तुळु, तेलुगु, कोरगा;

मध्य द्राविड : कुई, कुवी ( खोंड ), पेंगो, कोंडा ( कूबी ), कोया, मंडा, गोंडी, कोलामी, नायकी, परजी, कोंडेकोर गदबा ( सालूर ), ओल्लारी गदबा;

उत्तर द्राविड : कुडुख ( उरावनी ), माल्टो, ब्राहुई.

द्राविड परिवारातील तमिळ, तेलुगु, कन्नड आणि मलयाळम या भाषांना स्वतंत्र लिप्या असून या भाषांत फार प्राचीन काळापासून साहित्य-निर्मिती होत आहे. या चार भाषा, तुळु आणि कोडुगु अशा सहा भाषांची 'नागर-भाषा' म्हणून गणना होते. तुळु ( ९ लक्ष ) ही कर्नाटकातील मंगळूर व केरळातील कासरगोड जिल्ह्यात बोलली जाते. कोडगु ( ७८ हजार ) ही कर्नाटकातील कूर्ग जिल्ह्यात बोलली जाते.

उरलेल्या १९ द्राविड भाषा निरनिराळ्या आदिवासी जमातींमध्ये वापरात असल्याने त्यांची गणना 'आदिवासी भाषा' म्हणून होते. दक्षिण द्राविड गटातील तोडा, कोटा व बडगा या भाषा त्या त्या नावाच्या आदिवासी जमातींमध्ये बोलल्या जातात. या तिन्ही जमातींच्या वसाहती निलगिरी पर्वताच्या प्रदेशात असून त्यांची लोकसंख्या प्रत्येकी एक हजारावरही नाही. कोरगा ही मंगळूर जिल्ह्यातील उडुपी, करकल व कुंडापूर तालुक्यातील सुमारे एक हजार धनगरांची भाषा होय.

मध्य द्राविड भाषांपैकी गोंडी ( १४ लक्ष ) ही सर्वांत मोठी भाषा असून मध्यप्रदेश, महाराष्ट्र व आंध्रप्रदेशात बोलली जाते. हिच्या माडिया, मुरिया, राजगोंडी इ० बोली आहेत. महाराष्ट्रात चंद्रपूर, यवतमाळ व अमरावती जिल्ह्यात गोंडांची वस्ती केंद्रित झालेली असून ती २ लक्ष ७३ हजार एवढी आहे,

महाराष्ट्रातील यवतमाळ, वर्धा आणि आंध्रप्रदेशातील आदिलाबाद या जिल्ह्यात रहाणाऱ्या कोलाम या आदिवासी जमातीची भाषा कोलामी ( ४६ हजार ) होय. चंद्रपूर जिल्ह्यातील नायकी ( १५ शे ), बस्तरपट्टीतील परजी ( २० हजार ), कोरापुट ( ओरिसा ) व श्रीकाकुलम ( आंध्रप्रदेश ) या जिल्ह्यात बोलल्या जाणाऱ्या ओल्लारी गदबा ( ८ शे ) व कोंडेकोर गदबा ( ८ हजार ) या भाषा संरचनेच्या दृष्टीने कोलामी सदृश आहेत.

कोरापुट व आजूबाजूचे जिल्हे ( कोंढमाल, गंजम, श्रीकाकुलम, विझग ) मुंडा व द्राविड परिवाराच्या भाषा बोलणाऱ्या आदिवासी जमातींनी गजबजलेले आहेत. पेंगो ( १३ शे ), कोंडा ( १२ हजार ), कुवी ( २ लक्ष ), कुई ( ५ लक्ष ) व मंडा ( संख्या अनिश्चित ) ह्या या प्रदेशातील भाषा आणि बस्तरमधील कोया ( १ लक्ष ५० हजार ) संरचनेच्या दृष्टीने गोंडीशी जवळीक दाखवितात.

छोटा नागपूरच्या पठारावर रहाणाऱ्या उरांव या आदिवासी जमातीची भाषा कुड्ख ( ११ लक्ष ); आणि राजमहाल टेकडचा ( बिहार ) व पश्चिम बंगालमधील माल्टो ( ८९ हजार ) ह्या अतिउत्तरेकडील द्राविड भाषा होत. क्वेट्टयाच्या आसपास ( बलुचिस्तान ) बोलली जाणारी ब्राहुई ( ३ लक्ष ) ही भारताबाहेरील वैशिष्टचपूर्ण अशी उत्तर द्राविड भाषाच होय.

## ध्वनि-वैशिष्ट्ये

द्राविड भाषात आ[1] इ उ ए ओ हे पाच ऱ्हस्व स्वर व त्यांचीच पाच दीर्घ रूपे आ ई ऊ ए ओ असे दहा स्वर सामान्यपणे आढळतात. यांशिवाय कुड्खमध्ये अ आणि तेलुगु व तुळु यांमध्ये अॅ हे स्वर अधिक आढळतात. कोडगु, तोडा व बडगा या भाषांत प्रतिवेष्टित ( मूर्धन्यीकृत ) स्वरही आहेत. बडगामधील स्वरांची संख्या सर्वात अधिक, म्हणजे ३० इतकी आहे ! सानुनासिक स्वरांचा वापर फक्त तेलुगु, तमिळ व कोडगूमध्ये आढळतो, पण तोही अर्थभेदास कारणीभूत होत नाही. शब्दांचे उच्चारण स्वरान्त करण्याकडे ( विशेषतः उकारान्त ) प्रवृत्ती दिसून येते.

उदा० 'घर' : इल्लु ( ते. ), वीडु ( त. ), वीटु ( मल );
'नाक' : मुक्कु ( ते. ), मूक्कु ( त. मल. ), मूगु ( क. );
'तांबडा' : एरुपु ( ते. ), शिवप्पु ( त. ), चुकप्पु ( मल ), केंपु ( क. ).

मूर्धन्य ( ट ठ ड ढ ण ष ळ ) व्यंजनाचा वापर हे द्राविड भाषांचे एक प्रमुख वैशिष्टच आहे. आर्य भारतात आले तेव्हा त्यांच्या भाषेत द्राविड भाषांच्या संपर्काने मूर्धन्य व्यंजने रूढ झाली, असे मानले जाते. तोडा, कोटा, मलयाळम व तमिळ भाषेच्या दक्षिणेकडील बोलीतून दंत्य, वर्त्स्य व मूर्धन्य अशी तिन्ही प्रकारची व्यंजने आढळतात. ह्या व परजी, ओल्लारी या भाषांतून मूर्धन्य सघोष घर्षक ( सघोष 'ष' ) हा वैशिष्टचपूर्ण ध्वनी आढळतो. काही भाषांतून वर्त्स्य 'र' हा स्पंदित ध्वनीही वापरला जातो. मुंडा भाषांच्या साहचर्याने कुई, कुवी, पेंगो, मंडा कोंडा व गोंडीच्या अबूझमार बोलीत काकल्य ( कंठद्वारीय ) स्फोटकही आढळते. मळयाळममध्ये म न न् ( वर्त्स्य ) ण ञ ङ असे सहा नासिक्य वर्ण आढळतात. कोडगु मलयाळम व तुळूमध्ये शब्दारंभीही 'ञ' हे व्यंजन येऊ शकते, उदा. मलयाळम : ञान् 'मी', ञण्डु 'खेकडे'.

१. ऱ्हस्व 'आ' चे लेखन मात्र 'अ' असेच होते.

तोडा भाषेत सर्वाधिक, म्हणजे ११ घर्षके ( ऊष्मे ) आहेत. इतक्या संख्येने घर्षके वापरणारी भारतातील ही एकमेव भाषा होय.

मराठी भाषेत दंत्य व तालव्य अशी दोन प्रकारची घर्षस्फोटके आढळतात. उदा. दंत्य च ज ( चुरा जोर ) आणि तालव्य च ज ( चहा, जीव ). तेलुगु, गदबा व उत्तर कन्नड बोलीत ह्या दोन्ही प्रकारचे ध्वनी आहेत. मूलतः द्राविड भाषांत महाप्राणयुक्त ध्वनी नव्हते. संस्कृत व अन्य आर्यभारतीय भाषांच्या संपर्काने हे ध्वनी या परिवाराच्या भाषांतून शिरले. या उलट स्वरमध्य अघोष स्फोटकांचे सघोषीकरण करण्याची प्रवृत्ती आर्यभारतीय भाषांनी उचलली. तमिळ व मलयाळममध्ये सघोष व अघोष ध्वनीत अर्थभेदकारक विरोध आढळत नाही. सामान्यतः शब्दारंभी अघोष तर स्वरमध्य सघोष स्फोटके येतात. या वैशिष्टयामुळे या भाषांचे लोक हिंदी वा मराठी शिकताना ह्या ध्वनींच्या उच्चार व लेखनात घोटाळे उडवून देतात 'धान' आणि 'खान' यांचा 'दान' आणि 'कान' होतो; 'मर्ती'चा 'मूर्थी', 'कला'चा 'खला' व 'षण्मुखम'चा 'शनमुगम' होतो. लिहितात 'कंका' व वाचतात 'गंगा'!

## रूपरचना – विशेष

द्राविड भाषांतील लिंगव्यवस्था वैशिष्टपूर्ण आहे. एका टोकाला तोडा व ब्राहुईत लिंगभेद अजिबात नाही; तर, दुसऱ्या टोकाला अन्य द्राविड भाषांत नामांचे प्रथम मनुष्य व मनुष्येतर नामे व मनुष्यवर्गात परत पुल्लिंगी व स्त्रीलिंगी नामे असे भेद होतात. सर्वनामांचेही याप्रमाणेचे वर्गीकरण होते. शिवाय एकवचनी रूपांमध्ये होणारे भेदाभेद अनेकवचनी रूपांमध्ये आढळतीलच असे नाही.

तमिळ सर्वनामांची व्यवस्था खालीलप्रमाणे आहे :

| ए व. | अ. व. |
|---|---|
| मानव पुं. – अवन् | मानव – अवर् |
| स्त्री - अवळ् | |
| मानवेतर – अदु | मानवेतर – अवय् |

तेलगु, कुडुख व माल्टोत जरा वेगळी व्यवस्था आढळते.

| ए व. | अ. व. |
|---|---|
| मानव पुं. – वाडु | मानव – वारु |
| इतर – अदि | मानवेतर – अवि |

हा प्रकार प्राचीन द्राविड भाषेतील लिंगव्यवस्थेचा प्रातिनिधिक होय. गोंडी, कोलामी, परजी इ० मध्य द्राविड भाषात उभयवचनी स्त्रीलिंगभेद होत नाही. उदा. गोंडी :–

| ए. व. | अ. व. |
|---|---|
| मानव पुं. – वोर् | मानव पुं. – वूर् |
| इतर – अद् | इतर – अव् |

द्राविड सर्वनामे मराठीप्रमाणे प्रथमपुरुषी अनेकवचनी रूपात समावेशक ( आपण ) व परावेशक ( आम्ही ) असा भेद करतात. उदा. तमिळ : नाम् (आपण ), नान्गळ् ' आम्ही ' तृतीयपुरुषात निकटत्वदर्शक (हा) व दूरत्वदर्शक (तो) अशी दोन्ही प्रकारची सर्वनामे आढळतात उदा. तेलुगु : इदि 'ही, हे', इवि 'ह्या, ही'; अदि 'ती, ते' अवि 'त्या, ती' परंतु संबंधी ( जो ) सर्वनामे वापरात नाहीत.

द्राविड भाषात नामाला होणाऱ्या विकारांची संरचना पुढीलप्रमाणे असते.

नाम +( अनेकवचन ) + ( सामान्यरूपाचा प्रत्यय ) + विभक्ति प्रत्यय किंवा परसर्ग.

सामान्यरूपे व परसर्गांचा वापर ही खास द्राविड भाषांची वैशिष्ट्ये प्रचलित आर्यभारतीय भाषांतही दिसून येतात. द्राविड भाषात संस्कृत वा मुंडा भाषांप्रमाणे द्विवचन नाही. तसेच अचेतन नामांची अनेकवचनी रूपेही सहसा होत नाहीत. नामांची काही अनेकवचनी रूपे खालीलप्रमाणे सिद्ध होतात.

तमिळ : मकळ् – इर् ' सभ्य स्त्रिया ', ताय् – मार् ' माता '
मलयाळम : मात् – अर् ' स्त्रिया ', अण्णन् – मार् ' मोठे भाऊ '
कन्नड : अत्तेय् – अरु ' सासवा ', सोसेय् – अरु ' सुना '.
तेलुगु : कोडुकु – लु ' मुलगे ', अन्न – लु ' मोठे भाऊ '.

संस्कृत व अन्य आर्यभारतीय भाषांत विशेषण व विशेष्य यांमध्ये अन्वय-संबंध आढळतो. संस्कृतमध्ये विशेषणाला विशेष्याच्या लिंगवचनविभक्तीस अनुसरून प्रत्यय लागतात. मराठीत काही विशेषणांना लिंगवचनाचे प्रत्यय लागतात व विशेष्यास अनुसरून त्यांचे सामान्यरूपही होते. परंतु द्राविड भाषांत विशेषणे अविकारी रहातात. ती विशेष्यापूर्वी येतात एवढेच. धातुसाधितांचाही नाम व विशेषणासारखा उपयोग होतो. जसे :–

तेलुगु : वेळ्ळिन वाडु 'गेलेला' वेळ्ळिन पिल्लावाडु 'गेलेला मुलगा', वेळ्ळिन आमे 'गेलेली', वेळ्ळिन कुक्का 'गेलेला कुत्रा'.

उभयान्वयी अव्ययाऐवजी पूर्वकालवाचक धातुसाधित वापरतात. उदा० कन्नड : एन्दु 'बोलून.'

द्राविड वाक्यातील शब्दानुक्रम आर्यभारतीय भाषांप्रमाणेच असतो. कर्त्याचे स्थान वाक्यारंभी; तर क्रियापदाचे वाक्यांती असते. उदा० तेलुगु : मीरु चेसिन पनि बागा उन्दि. 'तुम्ही केलेले काम चांगले आहे." माडिया गोंडी : उन्दि गेडते चेडो मुरतो मन्दुर्. "एका रानात एक म्हातारी आणि म्हातारा रहात होते.' सामान्यतः 'अस्' धातूची रूपे गाळण्याकडे प्रवृत्ती दिसून येते. उदा० कन्नड : इद् नम् मने. हे आमचे घर (आहे)." द्राविड भाषांत कर्मकर्तरी प्रयोगाचा वापर होत नाही.

द्राविड शब्दसंग्रह

द्राविड भाषांतील बहुसंख्य शब्दांचे मूळ प्राक्कालीन आदिद्राविड भाषेमध्ये शोधता येते. असे असले तरी गेल्या तीन सहस्रकांत अन्य भारतीय भाषांमधील शब्दांचे ऋण मोठ्या प्रमाणावर झालेले आढळते. संस्कृत भाषेतील साहित्य, तत्त्वज्ञान, अध्यात्म, कर्मकांड, इत्यादींचा अभ्यास दक्षिणेत शतकानुशतके होत राहिल्याने संस्कृत तत्सम व तद्भव शब्दांचे ऋण प्रचंड झाले. मलयाळम सारख्या भाषेत ते ५८ टक्के इतके आढळते. तमिळमध्ये मात्र हे प्रमाण अत्यल्प आहे. आदिवासी द्राविड भाषांत आजूबाजूच्या नव–आर्यभारतीय व मुंडा भाषांतून शब्द शिरले आहेत. नागर भाषांतून इंग्रजी शब्दांचा वापरही कमी नाही.

संस्कृत वा इंग्रजी शब्द उसनवार घेताना त्यांच्यावर द्राविड संरचनेचा साज चढविला जातो. मलयाळममध्ये वापरात असलेले कालम् (काल), जनम् (जन), कारणम् (कारण), उपयोगम् (उपयोग) : किंवा तमिळमधील वेदनै (वेदना), कर्पनै (कल्पना), चम्बघम् (चंपक) इ० शब्द उदाहरणादाखल सांगता येतील. इंग्रजी ऋणांवर देखील असेच संस्कार घडतात. उदा. पेपर हा शब्द मलयाळममध्ये पेय्पर्, तमिळमध्ये प्याप्पारू, तर कन्नडमध्ये पेप्रु बनतो. पेट्रोलचे पेत्रोळ किंवा पेट्रोलु बनते व बसचे बस्स किंवा बस्सु होते.

भारत प्रवेशानंतर आर्यांच्या वसाहतींचे जेव्हा स्थिरीकरण सुरू झाले, तेव्हा द्राविड व मुंडा भाषांतील शेकडो शब्द संस्कृतमध्ये शिरले. या शब्दांत

येथील वनस्पती, प्राणी, नद्या, ग्रामे इत्यादींची नावे तर होतीच, पण अन्यही अनेक शब्द होते. यांतील नीर, मीन, मुकुल, कुंतल, तामरस, ताल, केतक, कानन इ० शब्द नेहमी उल्लेखिले जातात. अशा शब्दांचा शास्त्रीय अभ्यास एमेन्यू, बरो, मायऱ्होफर या पाश्चात्य विद्वानांनी केलेला असून अनेक भारतीय संशोधकही ते काम पुढे चालवीत आहेत. मराठी, कोकणी उडिया, हिंदी आदि नव–आर्यभारतीय भाषांनीही द्राविड भाषांतील शब्दांचे ऋण केलेले आहे.

द्राविड शब्दांची कल्पना येण्यासाठी काही नेहमीच्या वापरातील शब्दांचे प्रमुख द्राविड भाषांतील पर्याय खाली दिले आहेत :

| शब्द | तेलुगु | तमिळ | मलयाळम | कन्नड |
|---|---|---|---|---|
| डोके | तल | तलै | तल | तले |
| हात | चेरिय | कै | कय्यु | कै |
| पाय | कालु | काल | काल | कालु |
| डोळा | कन्नु | कण | कण्णु | कण्णु |
| कान | चेवि | कादु | कादु | किवि |
| जीभ | नालुक | नाक्कु | नाक्कु | नालगे |
| दात | पन्नु | पल | पल्लु | हल्लु |
| गाय | आवु | पचु | पशु | हसु |
| बैल | एद्दु | काळै | काळ | एत्तु |
| घोडा | गुर्रमु | कुदिरै | कुदिर | कुदुरे |
| कुत्रा | कुक्क | नाय | नाय | नायि |
| मोर | नेमलि | मयिल | मयिल | नविलु |
| कावळा | काकि | काक्कै | काक्क | कागे |
| आंबा | मामिडिपण्डु | माम्बळम | माङ्ङ | माविनहण्णु |
| पेरू | जामपण्डु | कोय्याप्पळम | पेरक्क | पेरळेहण्णु |
| चिंच | चिन्तपण्डु | पुळि | पुळि | हुणिसेहण्णु |
| बाप | नान्न | अप्पा | अच्छन | अप्प |
| आई | अम्म | अम्मा | अम्म | अम्म |
| मुलगा | कोडुकु | महन | मकन | मग |
| मुलगी | कूतुरु | महळ | मकळ | मगळु |
| नवरा | मोगुडु | कणवन | भर्तावु | गण्ड |
| बायको | इल्लालु | मनैवि | भार्य | हेण्डति |

अनुक्रमणिका

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सोने | बङ्गारमु | तङ्गम | पोन्न | होन्नु |
| चांदी | वेण्डि | वेळ्ळि | वेळ्ळि | बेळ्ळि |
| कुलूप | ताळमु | पूट्टु | पूट्टु | बीग |
| होडी | पडव | पडघु | तोणि | दोणि |
| अग्नी | निप्पु | नेरुप्पु | तिय्यु | बेङ्कि |
| पाणी | नीळ्ळु | तण्णीर | वेळ्ळम | नीरु |
| काळा | नलुपु | करुप्पु | करुप्पु | कप्पु |
| आंधळा | गुड्डि | कुरुडन | कुरुटनाय | कुरुडु |
| एक | ओकटि | ओण्णु | ओन्नु | ओन्दु |
| दोन | रेण्डु | रण्डु | रण्टु | एरडु |
| तीन | मूडु | मूणु | मून्नु | मूरु |
| दहा | पदि | पत्तु | पत्तु | हत्तु |
| खाणे | तिनुट | उण | तिन्नुक | तिन्नुवुदु |
| घेणे | तीसुकोनुट | एडु | एटुक्कुक | तेगेदु |
| जाणे | पोवुट | पो | पोकुक | होगुवुदु |
| करणे | चेयुट | शेय | चेय्युक | माडुवुदु |

— अपूर्ण

◆ ◆ ◆

डॉ० सुरेश म० डोळके

# श्रीचक्रधरानिरूपित (?) ' संपूर्ण '

# श्रीकृष्णचरित्र : ४ :

## [ संहिता : लेखांक ३ ]

भीस्मवध— कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : "जी जी : भीस्म कैसा वधीला ?" : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : कौरवांपांडवा यूध्य मांडलें : तेव्हळि दूर्योधनाचेया साह्यालागी भौमासूराचा पूत्र भगदंत आला होता : तेणें पांडवाचें दळ काशावीस केलें : मग अर्जूनी वधीला : अैसे कौरव-पांडवा नव दीस यूध्य जालें : मग दूर्योधनें भीस्मातें भणितलें : ' हा ताता : काळ आन काम तूमचा अंकणा : मा तूम्हापूढा काइसी पांडवें ? : तूम्ही आमसी मावेचेचि म्हणा ! : ' अैसा नोकीला : तेव्हळि भीस्मदेवी भणितलें : ' ऊदयाचि नीःपांडवी पृथवी करीण का नीशस्त्री श्रीकृष्णाकरवी शस्त्र घेववीन : हे जरि नव्हवे तरि मी गंगेचा पूत्र भीस्मुचि नव्हे ! : आनि काइ ' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऊदीयाचि पांडवासहीत नदीसि बीजें केलें : तंवं भीस्में प्रातःकाळी आंघोळि करूणि देवपूजा केली : ध्यानी बैसला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयासमीप आसनी प्रतिष्ठिलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीरापांडवावीकासि खुणावीलें : जे भीस्मासि ऊदेयाचि अेकअेक दंडवत करा ' : मग पांडवी काळेयानीळेया पाटाऊवाचीया बूंथी घेऊनि अेकअेकें भीस्मासि सव्य घालूणि ऊदीयाचि दंडवतें केली : तो म्हणे ' चीरंजीव चीरंजीव ' : मग : भीस्माचें ध्यान वीसर्जलें : डोळे ऊघडीले : तंवं श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति देखीलें : श्रीकृस्णा भीस्में भणितलें : ' हे काइ जी : सर्वज्ञ केव्हेळी बीजें केलें ? ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति [ भणितलें* ] : ' आताचि हे अेथ आलें ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' राजे हो : तूम्ही प्रतीज्ञा घेतली जे नीःपांडवी पृथवी करीण : हे साच की आता चीरंजीव भणितलें हे साच ? ' : भीस्में भणितलें : ' हे अवघें सर्वज्ञचि करीताति : तरि आता चीरंजीव हे साच :

अनुक्रमणिका







क्षामचे प्राण अर्जूनाचेनि बाणें जाती : आनि काइ' : मग दोघा घोरांधर यूध्य प्रवर्त्तलें : मग दोघाचा बाणजाळी आकाशीची वीमानें पळाली : अंधःकार रुपडीला [अंधःकारु पडीला] : दोन्ही सैन्य रणभूमीहूनि पळाली : मग भीस्मदेवी अर्जूनासि काशावीस केलें : तेव्हळि अर्जूनी भीस्मावरि अंबापत शस्त्र घातलें : तेणें भीस्म काशावीस जाला : मग भीस्में परशरामाचा बाणी अंबापत्त शस्त्र तोडीलें : मग भीस्में अमोघ बाण अर्जूनावरि घालावया हाती घेतला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रतीज्ञा सांडौणि सूदर्शन हातवटीलें : मग भीस्में भणितलें : 'हा हो अेकी मी भीस्म आपूली प्रतीज्ञा साच केली' : मग भीस्में गळा धनूष्य घातलें आन ऊगाचि ऊभा राहीला : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनातें भणितलें : 'घे घे काइ पाहात असेसि : मग अर्जूनदेवी सीखंडीतें पूढें करूणि बाणी वींधौणि मोरु केला : अैसा भीस्म सर्वांगी खीळीला : मग रथाखाली ऊलंडौणि पडीला : भूमी पावो न वचेचि : शरपंचरीचि होता : भीस्माचें शीर वीकळ गेलें : तेव्हळि भीस्में अर्जूनाकरवी बाणाची ऊसीसी देववीली : तेणें दीधली : मग शरपंजरी पडीलीया भीस्मातें श्रीकृष्णचक्रवर्त्ति सपरीवारी सांभाळावया गेले : भीस्मातें संबोखीलें : मग भीस्मदेवी श्रीकृष्णचक्रवर्त्तीची बरवी स्तूति केली आन भणितलें : 'जी जी : मी मसकु : माझा लळा सर्वज्ञ पाळला' : मग श्रीकृष्णचक्रवर्ति मेलीकारासि बीजें केलें'' : महदाइसी पुसिलें : ''जी जी : भीस्माचा बाणी अर्जून पडता तरि श्रीकृष्णचक्रवर्त्ति काइ करीते ?'' : सर्वज्ञें म्हणितलें : ''बाइ : भीस्माचा बाणी अर्जून ठाकता तरि श्रीकृष्णचक्रवर्त्ति अे पृथवीचे ढेवल अेरी वाहानी घालीले : १ : तथा हे पृथवी अेरीवाही घालीजती : भणौनि श्रीकराचा अनूकारु दाखवीला'' : ॥ ९० ॥

जयद्रथवध—कथन : ॥ ॥

महदाइसी पुसिलें : ''जी जी : भीस्म पडीलेंयानंतरें कौरवी काइ केलें ?'' : सर्वज्ञें म्हणितलें : ''बाइ : भीस्म पडीलीयानंतरें दूर्योधनें द्रोणासि रणपट बांधला : मग द्रोणें दोनि दीवस यूध्य केलें : मग तेरसाचा दीवसी द्रोणाचार्याचे सीक्ष सूसूप्तककोळी आले : तेही अर्जूनातें यूध्यालागी बोलाऊ पाठवीलें : ते दीवसी अर्जून सुसुप्तककोळीयासि जुंझावेया गेला : अर्जूनी भणितलें : 'आम्ही येवोतंवं तूम्ही यूध्य सावरावें' : अेरीकडे द्रोणें कौरवाकरवी चक्रवीहु मांडवीला : तेही मांडीला : मग द्रोणें यूधीष्ठीरातें जुंझावेया पाचारु पाठवीलें : तेव्हेळी यूधीष्ठीरें भीमसेनासि भणितलें : 'भीमसेनहो कौरवी चक्रवीहु मांडीला आसे : चक्रवीहूचा रीगावा आम्ही कवणीचि नेनो : अर्जून सुसुप्तककोळीयासी जुंझावेया गेला : न वचीजे तरि भ्याले म्हणतील : अर्जून

तरि अेय असेना ' : अैसा युधीष्ठीरासि वीचार करीता अभीमन्या आला : तेणें भणितलें : ' ताता चक्रवीहुचा रीगावा मी जाने : परि नीगावा नेने ' : तेव्हळि भीमसेनें भणितलें : ' तू रीगावा करी तरि मी गदाघातें नीगावा करीण ' : अैसें भणौनि यूध्यासि नीगाले : सवें भीमसेनु नकूळ साहादेव द्रौपद वैराठ हेही गेले : मग दोही दळा तुंबळ यूध्य आरंभलें : तेव्हेळि द्रोणें भीमसेनातें पाचारीलें : अस्वस्थामेनि नकूळा साहादेवातें पाचारीलें : कृपाचार्यें द्रौपदा वैराठातें पाचारीलें : मग परस्परें जुंझो लागले : तेव्हळि अभिमन्य चक्रवीहूमाजी प्रवेशला : तेणें कर्ण पराभवीला: अेक अक्षोहीनी माहावीर रणासि आनीले : पायदळासि मीति नाही : अैसा रीगावा करूणि पैलाडि गेला : परि नीगावा नेनेचि ! : तेणें तेथ रथ स्थीर केला : अेरीकडे द्रोणें भीमसेन बाणी खीळीला : तया मूर्छा आली : मग तेथौनि द्रोण नीगाला : तो अभीमन्याजवळि आला : द्रोणेंसी अभीमन्ये थोर यूध्य केलें : मग अभीमन्ये द्रोण पराभवीला : तेणें अभीमन्यासी आळंगीलें : गळाची मूक्तमाळा दीधली : मग द्रोण नीगाला : तो दूर्योधनाजवळि गेला : मग भणितलें : ' राया : अभीमन्यासारीखा पूत्र तूमचा कूळी नाही ' : अैसी बहूत स्तूति केली : ते आइकौणि दूर्योधनाचा पूत्र लक्ष्मण नीगाला : तयासि द्रोणें बहूत वारीलें : परि तो नाइकेचि ! : मग दूर्योधनें सवें जयद्रथ दीधला : अैसे दोघें अभीमन्याबरि चालीले : ते देखौणि अभीमन्ये रथाखाली ऊडी घातली : धावौणि लक्ष्मण गदाघाये मारीला : तेथौनि गदा भवंडीतेंचि जयद्रथाचीया रथाचेया मकरतोंडावरि पाये देऊनि जयद्रथासि हानीतीलें : तेणें तो घाव चूकवीला : अभीमन्ये बळात्कारें धरूणि त्याचा ध्वजास्तंबी त्यासि बांधलें : ते आइकौणि दूर्योधनद्रोणकर्ण तेथ आले : अवघे कौरव मीनले : मग तेही अवघा अेकेंचिवेळे अभीमन्यासि वींधीलें : अभीमन्ये तेतूकेंही नीवारीलें : अैसा अभीमन्य कव्हणाही नांगवेचि ! तेव्हळि कर्णें ब्रह्मशक्ती घालूणि अभीमन्याची मनकटें तोडीली : मा अभीमन्ये पापरघातें आन हातीकरूणि बहूत वीर मारीलें : अैसें जुंझता अवघीया कौरवी बाणी जर्जर केला : मग पडीला : तेव्हेळी हाहाकार जाला : अैसें कौरवी तूंबळ करूणि अभीमन्यातें पाडीलें : अभीमन्या (न्यां ?) पडीला भणौनि तेथ जयद्रथ पैलाकडौणि पाहो आला : तंव अभीमन्या घायी पडीला असे : हुंबत असे : टकमका वास पाहात असे : ते देखौणि जयद्रथें अभीमन्यातें पापरा हानीतलें : आन भणितलें : ' हे काइ अभीमन्या : अर्जूनाचा पूत्र काइ नव्हेसि ? : सोरु लोळे अैसा लोळतासि : मघाचा का नव्हेसि : अभीमन्ये तया अेइतें पाहूनि माथा तूकीला : पापरेचें थोर दू:ख मानीलें : तंव अेरीकडे भीमसेनु पाहाराअेका सावधा जाला :

मा अभीमन्यातें चोजऊ लागला : चोजवेचि ना : भणौनि मेल्लीकारासि गेला : तेयही न देखेचि : अैसा समै हेर आले : तेही युधीष्ठीरासि सांघीतलें : 'जी : अभीमन्या पडीला ! ' : मा अवघेया थोर दूःख जालें : तंवं सुसुप्तककोळीयातें जीनौनि अर्जून आले : तेही हे आइकीलें : मग रूदन करू लागलें : तेव्हेळी श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूना : क्षेत्री नव्हेसि काइ ? : बाइलेचीया परी रडतासि ! : चाला अभीमन्यातें पडीताळ : मग बंबाळदीबीयासी अभीमन्यातें पडीताळावया गेले : अेका मडीयावरि पावो देती : अेक मडी चूकवीती : जेय अभीमन्या पडीला होता तेथ पांडवदळीचे थोर थोर वीर पडीले होते : मध्यें अभीमन्या पडीला असे : घाये सकडतरला असे : मग अर्जून अभीमन्याजवळि गेला : त्यातें देखौणि अर्जूनदेवी बहुत दूःख केले : मग अर्जूनें पुसिलें : 'बा अभीमन्या तूज कवण घाये मारी असति : काइ दूखत असे ? ' : घाये असूख असता अभीनन्या वास पाहूनि अर्जूनदेवातें भणितलें : 'ताता माझे घाये अवघेचि सौम्य असेति : हळु असे : दूख काही नसे : परि अेकचि घावो मारी असे ' : 'तो कवण रे बापा ' : तेणें भणितलें : 'ताता मज पडीलीया माहावीरासि जयद्रथें पापरा हानीतलें : ते मज थोर दूःख असे ' :। : महदाइसी भणितलें : " हा जी : पडीलीया पापरा तेणें का हानीतलें ? ' :। : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : पूर्वी अभीमन्यें जयद्रथातें बांधलें होतें : तेणें द्वेषें हानीतलें " । तेव्हळि अर्जूनें प्रतीज्ञा घेतली : 'ऊदैक अस्तगतेंनि सूर्यें जयद्रथ वधीन : न वधवे तरि अग्नीप्रवेशु करीण ' : हे आइकौणि अभीमन्याचा प्राण गेला : मग अर्जून मेल्लीकारासि गेले : अभीमन्यातें संस्कारीलें : तेतूका समै कौरवाचे हेर होते तेही आइकीलें : जाऊनि दूर्योधनाप्रती सांघीतलें : तेव्हळि द्रोणें आन दूर्योधनें भणितलें : 'ऊदीयाचि काइ अर्जूनाचेनि जयद्रथ वधवत असे ? ' : अवघे मीळौनि जयद्रथासीचि राखा : अनयासेंचि अवघें आमचेया सूत्रा आलें असे : अनयासें दंद हातासि अेइल : येश न्होइल : ऊदया थोर जुंझ होयील : बहूत सैन्य आटैल : परि जयद्रथ रक्षावाचि ' :। : मग अेरी दीवसी जुंझ मांडलें : तेव्हेळी तेही चौव्यूहामाजी भूयर केलें : तेथ भूयरी जयद्रथ घातला : मग कौरवा-पांडवा संग्राम मांडला : तेव्हळि अर्जून संग्रामा नीगाले : तीये दीवसी तूंबळ जुंझ जालें : सैन्य बहूत आटलें : अर्जूनदेव दोही हाती संधान करीति : परि क्षेत्री नीवारेति ना : ते दीवसी अर्जूनी सात अक्षौहीणी सैन्य संहारीलें : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांच्यजन्य शंखस्फूरण केलें : परि अर्जूनाचा शंख स्फूरेचि ना : तेव्हळि युधीष्ठीरें भणितलें : 'काइ अर्जून पडीला अैसें जालें?' : भणौनि साहादेव नीगाला : तेणें सात अक्षौणी सैन्य रणासि आनीलें : मग

अनुक्रमणिका

तयाचाही शंख फूरेचिना : तेव्हळि यूधीष्ठीरें भणितलें : 'काइ साहादेव पडीला असें जालें ?' : भणौनि भीमसेन नकूळ नीगाले : तेही नवक्षौणी सैंन्य रणासि आनीनें : तयाचेही शंख स्फूरतीचि ना : इतुकेनि धर्म भीयाला : तंव तेही चौघी अेकेंचि वेळ शंखस्फूरण केले : तेव्हळि यूधीष्ठारासि असें जालें जे आहेति : तंव घटीका च्यारि दीवस ऊरला : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति सूर्याआड सूदर्शन घातलें : मग अंधःकार पडीला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूनहो आपूली प्रतीज्ञा सांभाळा' : 'होका जी' : अस्तमान जालें भणौनि जुंझ पारुखलें : काष्ठाचें शरण रेइलें : अग्णी प्रजळीला : तो प्रजळला : अर्जूनदेव स्नान करूणि आले : तैसेचि अर्जूनी अग्णीप्रवेश करू आदरीला : अर्जून प्रतीज्ञाहत जाला : तो अग्णीप्रवेश करीताये भणौनि समस्त कौरव कौतूक पाहावेंया आले : त्याचिमागें जयद्रथ आला : तो आंबेयाचीये पश्चीमीलीये खांदीयेवरि बैसला : तेव्हळि अर्जूनीं अग्णीसि प्रदक्षेणा केली : तंव श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूना बाइलेचीया परी अग्णीप्रवेश काइ करीतासि ?' : क्षेत्री जे होती ते काइ नसूध्दाहाती अग्णीप्रवेश करीती? : आपूलेनि शस्त्रेंसी अग्णीप्रवेशु करीती की : धनुष्य कोणाकारणें ठेवीतासि? : मागा काइ अभिमन्यु असे ? : धनूष्य घे : बाण गूणी लावी' : 'होका जी' : भणौनि अर्जूनी धनूष्य घेतलें : बाण गूणी लावीला : रथावरि बैसौनि अग्णीप्रदक्षेणा करवीली : मग रथ सरणासमीप आला : अर्जून रथावरि पश्चीमामुख ऊभा राहीला : तेव्हळि लग्णघटीका अेकु दीवसु असे : अर्जूनी रथवरूणि ऊडी घालू आदरीली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनासि हाती धरीलें : सूर्याआडौणि सूदर्शण काढीलें : आन श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूना : हा घे सूर्य हा घे जयद्रथ' : भणौनि श्रीकरें आंबेयाकडे दाखवीलें : अर्जूनी तेणेंचि बाणें तयाचें शीर छेदीलें : तंव श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूना : हे शीर खाली पडो नेदावें : बाणवेन्ही पीटौणि ने' : मग अर्जूनी ते शीर बाणवेन्ही पीटौणि नेलें : तयाचा पीता समूद्राचा तीरी सूर्यासि अर्घ्य देत होता : त्याचीये आंजूळीयेसि ते पडीलें : आन तेणें बोळखीलें : 'काइ पा : माझेंया पूत्राचें शीर कवणें पाडीलें ?' : मग तेणें भणितलें : 'सूर्यासि अर्घ्य देइन : मग श्यापीन' : भणौनि खाली ठेवीलें : आन तयाचेंही पडीलें : तेथ दूर्योधनमूख्य समस्त कौरव माहावीरु अर्जूनासि पाहो आले होते : तेही हाहाकारु केला : समस्त कौरव 'अधर्म केला' 'अधर्म केला' भणौनि बोबाइले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति मेघगंभीरवाचा भणितलें : 'आगा कौरवहो : तूम्ही कोण धर्म केला ? : बाळकें तूंबळ करूणि वेढाळूणि तथा वेढूणि मारीलें' : मग

कौरव आपूलालेंया स्थाना गेलें : बाइ : जयद्रथ अैसा वधीला ": महदाइसी भणितलें : " जी जी : तेणें जैसें केलें तैसा पावला " : यावरि सर्वज्ञ इष्टीत हास्य केलें : ॥ ९१ ॥

द्रोणवध-कथन : ॥ ॥

महदाइसी पुसिलें : ' जी जी : द्रोण कैसा वधीला तो नीरोपावा " : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : जयद्रथ पडलीयानंतरें श्रीकृष्णचक्रवर्त्ति घटोत्कचातें आफाऊनि तयातें भणितलें : ' आपूलीया पूर्वजाचे वैरी मारि ' : मग तो घोरंदर रूप धरूणि अवघेया कौरवा गीळू लागला : योजनभरि मूख पसरीले : मग दूर्योधनें भणितलें : ' कर्णेहो आजि पाहेवें बोलनें : हा घटोत्कच वधि ' : मग कर्णें आदावळि घालूणि घटोत्कच वधीला : अेरी दीवसी द्रोण आपूले सीक्ष नवकोडी सुसुप्तक पाचारीले : तेही पांडवाचें दळ काशांवीस केलें : मग ते नवकोडी सुसुप्तक अर्जूनदेवी वधीले : मग अेरी दीवसी रणभूमीसि द्रोण ऊभा राहीला : द्रोणें अवघे पांडव त्रासीले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' अर्जूनदेवहो : द्रोणाचार्या तूम्हासि अवध्य ' : मग भीमसेनातें भणितलें : ' भीमसेनहो तूम्ही अश्वस्थामा बांधौणि लपवा ' : तेव्हळि भीमसेन रणभूमीसि जाऊनि अवस्थामेयातें बांधौणि रथावरि टाकीलें : त्याची शूद्धी कव्हणाही नाही : मणौनि द्रोण देह सांडौणि अष्टौलोकपाळ हींडीन्नला : तयातें पुसिलें : ' माझा पूत्र तूम्ही आनीला ? ' : तेही भणितलें : ' नाही ' : द्रोण तो वीदेही : देह सांडु सके : घेवो सके : अेरीकडे श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनदेवातें भणितलें : ' हे देह वीगळीत करि ' : मग अर्जूनी बाणवेन्हीं ते देह फोडुनि वीसगळीत केलें : तंवं द्रोण आला : ते देह न देखेचि : मग भणितलें : ' मीया यूध्य केलें नाही : येकाधेया क्षेत्रीयाचेंया देहांत रीगैन : आन यूध्य करीन ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' द्रोणाचार्येहो तूम्ही ब्राह्मण : क्षेत्रीयाचें देह घ्याल तरि तूम्हासि अधःपात होइल ' : मग द्रोणें भणितलें : ' जी जी : माझा पूत्र बधवाना : आनि मज मोक्ष दयावा ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मानीलें " :। सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : द्रोणासि पूत्राचा वीयोग : आन अपमानाची लाज : मणौनि देह त्येजीलें : मग द्रोण श्रीकृष्णचक्रवर्त्ति फळी बैसवीला " :। महदाइसी पुसिलें : " जी जी : द्रोण हा कवण ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " द्रोण हा आठांतूला माहादेवाचा वीद्यावंत " :॥९२॥

कर्णसैल्यदूर्योधन–वध–कथन :॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : द्रोण वधीलीयानंतरें दूर्योधनें कर्णासि रणवट्ट बांधला : तेणें दोनि दीवस यूध्य केलें : मग अर्जूनें वधीला : मग सैल्यासि रणवट्ट

बांधला : तोही वधीला : मग कर्णाचा पूत्रा(त्र) बळीकरण तो दूर्योधनें पाचारीला : मग तो पांडवावरि चालीला : तो कव्हणाचेनि न वधवेचि ! : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति कराळ रूप धरूणि वधीला : तेव्हळि धृतराष्टरें भीमसेनातें पाचारीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति लोहाचा भीम करूणि पाठवीला : तेव्हळि तो भीमसेनु बोलीला : 'नमस्कार' : धृतराष्टरें भणितलें : 'अेरे बा भेटो' : भणौनि क्षेम दीधलें : आन लोहाचा भीमसेनु शतचूर्ण जाला" : महदाइसी भणितलें : "जी जी : लोहाचा भीमसेनु कैसा बोलीला ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ वीज्ञा[न*] प्रकटीलें" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : तेथ गदायूध्य प्रवर्त्तलें : तेथ भीमसेन हस्ती हानौनि मारी : भवंडुनि टाकी : तंवं दूश्यासन घाया आला : तो पडीला : भीमसेनें भणितलें : 'हारे आम्हादेखता द्रौपदीयेसि हात लावीला तो तू होसिरे' : भणौनि ऊरावरि पावो देऊनि ऊजवीये बाहे ऊपडीली : आन भणितलें : 'आगा ये दोही रणीचे वीरहो : दूश्यास[न*] गाये आन भीमसेन वाघ : सोडवा सोडवा कव्हणी' : तंवं अर्जूनें आवेशीणि भणितलें : 'मी गाइब्राह्मणाचा वेळाइत : जाऊ सोडऊ' : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'रणी आवशले वीर काइअेक न बोलेति' : भणौनि वारीलें" ।: महदाइसी भणितलें : "दूर्योधनें काइ केलें ?" : सर्वज्ञें ह्मणितलें : 'बाइ : रणभूमीसि भीमसेनें समस्त कौरव वधीलें : मग दूर्योधन भागीरथीचा डोही पळाला : अश्वस्थामा थडीये बैसला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भीमसेनासहीत तेथ बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'भीमसेना पाचारी पा' : मग भीमसेनें पाचारीलें : मग दोघा माहायूध्य जालें : भीमसेनु भागला : श्रीकृष्णचक्रवर्त्तीची वास पाहीली : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति जानू थापटीली : ते भीमसेनासि खूण बाणली : मग तैसीची गदा मांडीवरि हानौणि पाडीला : मग म्हणे 'घे गा घे गा अर्द्ध राज्य' : अैसा रणभूमीसि पाडीला' : सर्वज्ञें म्हणितलें : "अभीमानें त्यासि अैसें जालें : बाइ" : ॥९३॥

## कौरवनीर्वाणी ऊत्तरकथाप्रसंगें यूधीष्ठीरा राज्यप्रदान–कथन :॥ ॥

महदाइसी भणितलें : "जी जी : कौरव संहारीलेंयानंतरें पांडवी काइ केलें ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : अठरा दीवसा बळिभद्र अेती भणौनि तीये दीवसी सूर्यासी अैसी आज्ञा केली : 'दूर्योधन वधेतंवं अस्तगत न व्हावें' : आन पृथवीसि अैसी आज्ञा केली : 'ज्या मार्गें बळिभद्र जात असेति तो मार्ग वाढवा' : मग बळिभद्री मार्गें जात तंवं टाकेना : दीवसाकडे पाहात तंवं दीवसही न माळवे : अैसे बहूत खेदखीन्न जाले : अेरीकडे भीमसेनें दूर्योधन वधीला : त्याचीया दोन्ही जानू वेगळीया जालीया : परि प्राण न वचे" ।:

अनुक्रमणिका

महदाइसी पुसिलें : “ जी जी : त्याचा प्राण का न वचे ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : अेक वेळ दूर्योधनें यूधीष्ठीरासि पुसिलें होतें : ‘ मी वज्रशरीरी काइसेनि होइन ? : आन माझें मरण काइसेनि होइल ? ’ : यूधीष्ठीरें भणितलें : ‘ तूवा नग्न होऊनि गांधारीयेजवळि जावें : ते तूज हातें स्पर्शील : तेणें तू वज्रशरीरी होसील : आन आमचा वधु केला भणौनि तोखसी : आन तेवीचि नाही जाला अैसें भणौनि खेदातें पावसी : इतूकेनि तूझा प्राण जाइल ’ : तेव्हळि दूर्योधन नग्न होऊनि गांधारीचेया राऊळा चालीला : तंवं ब्राह्मणाचेनि वेषें श्रीकृष्णचक्रवर्त्ति भेटले : तेही भणितलें : ‘ हे काइ राया : नग्न जालासि ? ’ : अैसें अवघा वृत्तांत सांघीतला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ रायासि नग्न जावो नये ’ : ‘ ना जी यूधीष्ठीरें आज्ञापीलें ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ मा वस्त्र नको नेसो ’ : तेव्हळि त्यासि फूलाचा चोळना नेसवीला : मग तो गांधारीयेजवळि गेला : मग भणितलें : ‘ मज स्पर्शी ’ : तेव्हळि गांधारीया त्यासि स्पर्शीलें : मग तेणें अवघा वृत्तांत सांघीतला : गांधारीया भणितलें : ‘ बा आपूलीया जानू जतन करावीया ’ : तेणें भणितलें : ‘ मा आता का स्पर्शीना ? : तीया भणितलें : यूधीष्ठीराची आज्ञा लंघली : आता काइ होईल ? ’ : मग तो वज्रशरीरी जाला : बाइ : तयाचा प्राण खेदाल्हादेंवीन [न*] वचेचि : तेव्हळि त्याजवळि रणभूमीसि अश्वस्थामा आला : मग दूर्योधनें भणितलें : ‘ आगा अश्वस्थामीया माझा प्राण खेदाल्हादेंवीन न वचे : तरि माझा प्राण जाये अैसें करी पा ’ : तेव्हळि अश्वस्थामेनि द्रौपदीयेचेया पाचा पूत्राची शीरें छेदूनि आनीली : मग भणितलें : ‘ घेया गा पांडवाची शीरें ’ : दूर्योधनें भणितलें : ‘ भीमसेनाचें शीर दे का ’ : तेव्हळि तेणें भीमसेनाचेंया पूत्राचें शीर दीधलें : ते दूर्योधनें बूकीया हानीतलें : तंवं ते शीर शतचूर्ण जालें : मग भणितलें : ‘ आहा पापीया : बाळकें काइसेंया वधीली ? ’ : इतूकेनि तयाचा प्राण गेला : येरीकडे अर्जूनी संतापें कौरवाचीया कूळावरि बाण घातला : तेणें बाणें गर्भ आदिकरूणि समस्त बाळें वधीली : तेव्हळि कर्णाची भार्या वृषकेत कूंतीयेजवळि घेऊनि गेली : मग वृषकेत कूंतीया राखीला : कर्णाचीया जाया अग्नीप्रवेश केला : दूर्योधन पडीला आइकोणि गांधारी रणभूमीसि आली : ते श्रीकृष्णचक्रवर्त्ति संबोखीली : तेव्हळि द्रौपदी आपूलेंया पूत्राचा वध आइकौणि अश्वस्थामेयाजवळि धावंत आली : मग अश्वस्थामेयातें श्यापीलें : ‘ तूझा आंगी भगें होति ’ : तंवं दीस माळवला : पांडव रणभूमीसि कौरवाचिया संस्कारालागी गेले : अवघें सैन्य मेल्लीकारी राहीलें : ते अवघे वीर नीद्राभूत जाले होते : तंवं बळिभद्र आले : त्याजवळि अश्वस्थामा कृपाचार्य हे गेले : तेही अवघा वृत्तांत

सांघीतला : मग मध्याने अेकी रात्री ते तीघै पांडवाचीया मेल्लीकारासि गेले : तेही ते नीद्रीत पंचतीसि अक्षौहीनी सैन्य मारीलें : दृष्टद्युम्ण सीखंडी मारीले : ते आइकौणि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ बीजें केलें : मग बळभद्रातें नीवारीलें : बळिभद्रासि—पांडवासि अैक्य केलें : मग बळिभद्र द्वारकेसि पाठवीले : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीरासि राजी बैसवीलें" : ।।९४।।

ब्रह्मास्त्र शस्त्रकथाप्रसंगें मोक्षधर्मश्रवण—कथन :।। ।।

महदाइसी पुसिलें : "जी जी : तयाऊपरि पांडवी काइ केलें ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : कुरुक्षेत्र नीवारीलेंनंतरें यूधीष्ठीर म्हणे : ‘मीया जींकीलें’ : भीमसेन म्हणे : ‘मीया जींकीलें’ : अर्जून म्हणे : ‘मीया जींकीलें’ : अैसे अवघे आपूलालेंया व्यवा देति : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘तूम्ही अवघे जाऊनि बबृतें पूसा : मग तो सांघैल ते साच’ : तेही अवघे अेऊनि बबृसी पुसिलें ‘अगा बबृ कवणें जींकीलें ?’ : तेणें भणितलें : ‘मी सूदर्शन भवंता देखे : सूदर्शन मारीता देखे : तेचि अवघेयाची शीरे तोडी : तूम्हा अवघेयाचे बाण अेक इकडौणि जाती : अेक तीकडौणि जाति : तयाचेनि काहीचि नव्हवेचि : तूम्ही अवघेचि लटीके’ : इतूकेनि तया अवघेयाचा वर्मु हरीला : तेव्हळि बबृचा प्राण गेला : मग तो पांडवी संस्कारीला :

तंवं येरीकडे अश्वस्थामेनि पांडवकूळावरि ब्रह्मशस्त्र मोकलीलें : ते जाळीत चालीलें : तेणें अवघेया पांडवकूळासि संहारु केला : गर्भ आदिकरूनि वधीला : तेव्हळि ते ब्रह्मशस्त्र ऊत्तरेजवळि आलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तितें तीयें आंकांती स्मरीलें : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ सूदर्शन घेऊनि बीजें केलें : मग ते नीवारीलें : अैसेंया घोरांदरा संकटापासौनि पांडवाचेंया संतानालागी अेकु परीक्षीतू श्रीकृष्णचक्रवर्त्ति रक्षीला : अैसें भारथयूध्य नीवर्त्तलेंयानंतरें गोत्रजवधें शोकमोहें व्याकूळ होत सांता बंद्धुसहीत यूधीष्ठीरु सरपंजरस्था भीस्माजवळि गेला : सवें श्रीकृष्णचक्रवर्त्ति : तेथ यूधीष्ठीरें गोत्रजाचें दुःख केलें : त्यातें भीस्में संबोखीलें : मग यूधीष्ठीरें भीस्मासि मोक्षधर्म पुसिलें : तें भीस्में नीरोपीले : मग भीस्में प्रवत्तधर्म नीवृत्तीधर्म आपःधर्म कर्ममार्ग नीरोपीले : ते श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीरें आइकीले : मग ऊत्तरायेणी भीस्में देहत्यागु केला : त्याचा पांडवी यथावीधि संस्कारु केला : मग यूधीष्ठीराचें दूःख नीःशेष जाळीलें : बाइ" : ।।९५।।

अश्वमेधकथन :॥ ॥

एकु दी भटी पुसिलें : "जी जी : पांडवी अश्वमेध केला ते कथा नीरोपावी जी" : सर्वज्ञें म्हणितलें : "वानरेया : पांडवी कौरव संहारीले : मग हस्तीनापूरी राज्य करू लागले : तवं तेथ व्यास आला : त्यासि यूधीष्ठीरें बरवा आदरु केला : मग त्यासि यूधीष्ठीरें गोत्रजहणनप्रायेश्चीताचा प्रश्ण केला : तेव्हळि व्यासें अश्वमेध नीरोपीला : 'श्यामकर्ण घोडा आनौणि पृथवीवरि सोडीजे : मग अवघे पृथवीचे राये जीनौणि घोडा यागी घालीजे' : असें व्यासें सांघीतलें : मग यूधीष्ठीरें भणितलें : 'श्यामकर्ण घोडा काइसेनि जोडैल ?' : मग व्यासें भणितलें : 'भद्रावती नगरी यौनश्वा रावो असे : तेणें सूर्यातें जीनौनि घोडा आनीला असे : तो अष्टादश वर्षाचा : घडीये घडीये अेक अेक वर्ण पालटे : तो घोडा जरि यागी पडे तरि याग परीपूर्ण चरीतार्थ होइल : तो घोडा आनावेंयालागी यूधीष्ठीरें भीमसेन घटोत्कचाचा पूत्र मेघवर्ण कर्णाचा पूत्र वृषकेत हे तींघें धाडीले : ते तींघें नीगाले : ते भद्रावतीयेसि गेले : भीमसेन भडखळी अेकौ राहीला : मेघवर्ण वृषकेत हे दोघें पानीयेडासि गेले : तवं तो घोडा पानीवथेयासी नीगाला : सर्वे चहूकडे पानीयाची भडखाळ : असा तो घोडा पानीवथेयासी आला : पानीयांतु रीगाला : पानी पीगाला : मग बाहीरि नीगता मेघवर्णे खांदी घेऊनि ऊत्पवन करूणि गगणमार्गें नीगाला : तवं परीवार सूटला : तो वृषकेतें सांवरीला : ते आइकौणि सपरीवारी यौनश्वा राया चालीला : तेव्हळि भीमसेन आन वृषकेत यूध्या नीगाले : मग रायाचा पूत्र सुवेग तो भीमसेनेंसी भीडला : तो तेणें पराभवीला : मग भीमसेनें तया रायाचें सतरा अक्षौहाणी सैन्य संहारीलें : ते देखौणि राये भणितलें : 'हा रे हा अेक : आन अेनें अवघा परीवार संहारीला : पूसा पा यासी हा कवण : दैत्य की दानव : की देव ?' : भणौनि बंदीजन पूसो पाठवीले : मग बंदीजनें अेऊनि भीमसेनासि ब्रह्मायू केल : आन पुसिलें : 'तूम्ही कवण ?' : तेव्हळि भीमसेनें भणितलें : 'मी पांडवरायाचा पूत्र भीमसेन : हा वृषकेत माझीया वडीला बंधूचा पूत्र : जेणें घोडा नेला तो माझा नातू मेघवर्ण' : मग बंदीजनी जाऊनि रायाजवळि सांघीतलें : मग राये भीमसेनासि झुंझावया पाचारीलें : तेव्हळि वृषकेतें भणितलें : 'ताता मज असता तूम्ही नको जावो' : तेव्हळि वृषकेत नीगाला : रायासी आन वृषकेतासी खांडोवींखांडी यूध्य जालें : वृषकेतें रावो पाडीला : पडता ऊसीसा मांडी दीधली : ऊदकें ऊदकें नेत्र परीमार्जीलें : सावध केला : मग भणितलें : 'उठा आता यूध्य करा' : राये भणितलें : 'तूवा माझा प्राण रक्षीला : आता यूध्य काइसें ?' : मग रावो तया तीघांसी मंदीरासी





घेऊनि गेला : वृषकेतासि आपूली कन्या दीधली : तोचि घोडा आंदन दीधला : मग भीमसेन तो घोडा घेऊनि रायासहीत हस्तीनापूरासी आले : यूवनश्वा श्रीकृष्णचक्रवर्त्ति– यूधीष्ठीरासि भेटला : मग तो घोडा द्रौपदीया वोवाळीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति मेघवर्णासि श्रीकंठीचा हारु दीधला : मग यूधीष्ठीरें छपन्न कोटी यादवासी सोळासहस्त्र अंतःपूरासी पाटमूखीयासहीत मूळ पाठवीलें : ते अवघी हस्तीनापूरासी आली : यूधीष्ठीरें बरवा आदरु केला : अवघेयासी राऊळगणें दीधली : मग यूधीष्ठीरें यज्ञदीक्षा स्वीकरीली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रद्युम्णासहीत अर्जूनासंघातें छेपन्नकोटी यादव दीधले : सवें वृषकेतु दीधला : मग अर्जूनी [पृथवी*]वरि घोडा सोडीला : अर्जूनासी पृथवीचे राये जीणता जेथ संकष्ट पडे ते श्रीकृष्णचक्रवर्त्ति परीहरेति : अैसे अवघे पृथवीचे राये जीनौणि अर्जून हस्तीनापूरासि आले : मग याग केला : मग यागी घोडा घातला : मग यूधीष्ठीरें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि अग्रपूजा केली : सकळ देवऋषी राजऋषी पूजीले : मग ते आपूलालेंया स्थाना गेले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति सपरीवारी द्वारकेसि बीजें केलें " : ॥ ९६ ॥

वज्रनाभवध–कथन :॥ ॥

एकु दी महदाइसी पुसिलें : " जी जी : वज्रनाभु कैसा वधीला ते कथा नीरोपावी जी " : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : वज्रनाभें तप करूणि ब्रह्मे तोखवीला : तेणें इंद्रादीकाचें राज्य घेवो आदरीलें : तेव्हळि इंद्रें भणितलें : ' कश्यपाजवळि जावो : तो जयासी स्वर्गाचें राज्य देइल तो घेवो ' : तेव्हळि दोघै नीगाले : ते कश्यपाजवळि आले : दोघी कश्यपाजवळि वृत्तांत सांघीतला : तयातें कश्यपें भणितलें : ' माझा यज्ञ होइल : मग तूमचा व्यवाद तोडीन ' : तेव्हळि ते आपूलालीया स्थाना गेले : तेव्हळि इंद्र श्रीकृष्णचक्रवर्त्तिजवळि आला : तेणें आपूला वृत्तांत सांघीतला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति वज्रपूरीसी प्रद्युम्ण पाठवीला : तो गूप्तरूपें तेथ गेला : तवं वज्रनाभाची कन्या प्रभावती तीयेचा स्वयवरालागी वज्रनाभें वीचारु केला : तवं आशीरीरी वाचा जाली : ' इयेचा वरैत तूझा संहार करील : ' मग तेणें ते ऊपरीयेवरि घातली : नीबंद्ध केला : मग प्रद्यूम्णें तीयेजवळि तूंडताळेंपणालागी हंस पाठवीला : मग प्रद्यूम्ण तेथ संचरो लागला : प्रद्यूम्णें तीयेचें पाणीग्रहण केलें : ते काळांतरें वज्रनाभासि ठाऊकें जालें : मग प्रद्यूम्णासि आन वज्रनाभासी माहायूद्ध जाले : तेथ श्रीकृष्ण-चक्रवर्ति बीजें केलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रद्युम्णाकरवी मारवीला : मग देवीं पूस्पवर्षावो क(के)ला : इंद्र सूखीया जाला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रद्यूम्णासि वज्रपूरीयेचें राज्य देऊनि द्वारकेसि बीजें केलें " : ॥ ९७ ॥





भक्ता राज्यप्रदान-कथन :॥ ॥

महदाइसी पुसिलें : "जी जी : सोळा सहस्र अंतःपुरें शतें आगळीया अष्टौपट्टमहीषी : आन उद्धवांसीही सातसे राणीया अैसें जी श्रीकृष्णचक्रवर्ति आपण राज्य केलें : आन भक्ताकरवी करवीलें : आता जे सर्वज्ञांजवळि अेताति तयातें सर्वज्ञ अैसें नीरोपीताति : 'जे अेथ अनूसरीजे : क्षौर कीजे : भीक्षा मागीजे : हे अैसें काइ जी ? : आम्हाकरवी का भीक्षा मागवीजे : तैसें का न कीजे ?" सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : तै देवें राज्यधर्म अंगीकरीले : मग देवें राज्य केले : भणौनि भक्ताकरवी राज्य करीलें : आन भक्ती राज्येंचि केलें : आता अेथ अैसीचि प्रवृत्ती : जे यतीमूनीचा वेष : अेथौनि अैसें कीजताये : जे तुम्हाकरवी भीक्षा मागवीली :" ॥ ९८ ॥

वीस्मृतोपदेशार्जूनप्रश्नें पूनःस्मरण-कथन : ॥ ॥

सर्वज्ञ भटांप्रती हे कथा सांघीतली : सर्वज्ञें म्हणितलें : "वानरेया : पाऊडा पावो तत्समयी श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनासि ब्रह्मवीद्याऊपदेश केला : । : बोध जाला" : भटी भणितलें : "जी जी : तो कैसा ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "वानरेया : श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूध्यसमयी अर्जूनाप्रती नीरोपण केलें : ते ते वीसरलें : मग यूध्य नीवळिलेंयानंतरें कव्हणी अेकी वेळी श्रीकृष्णचक्रवर्ति अर्जूनासी नीरोपण करीत होते : तथा श्रीकृष्णचक्रवर्ति बीजें करीत होते : तेव्हळि अर्जूनी भणितलें : 'जी जी : सर्वज्ञ यूध्यसमयी मज नीरोपण केलें ते मी वीसरला : तरि सर्वज्ञ मजपूढती नीरोपावें' : भणौनि नमस्कार केला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीरूपण केलें : ते प्रभवलें : चौ पुरुषार्थाचें ज्ञान केलें : अर्जून-देवी भणितलें : "जी जी : यूध्यसमयीं सर्वज्ञ नीरोपीलें : दीधलें होतें : ते आता तैसेंचि प्रतीभाषलें : अनूभवासि आलें :ः तूम्ही दनापथ्य घेइजे'' : ॥ ९९ ॥



श्री. आनंद ना. कुंभार

# सोलापूरच्या किल्ल्यातील कोरीव लेख

## किल्ल्यासंबंधी थोडी माहिती

सोलापूरला एक किल्ला आहे. तो किल्ला कोणी, केव्हा व का बांधिला ह्याविषयी इतिहासकार आणि संशोधकांत मतभेद आहेत. किल्ला केव्हा बांधला गेला ह्याबद्दल नक्की माहिती सांगणारी साधने सध्या तरी उपलब्ध नाहीत. तरीपण उपलब्ध साधनांवरून किल्ला केव्हा उभारला गेला असावा ह्याबद्दल अंदाज व्यक्त करता येतो. कोणी बांधला अथवा कोणाच्या आज्ञेने बांधला गेला हेसुद्धा बिनचूक सांगता येणे सध्या तरी कठीण आहे. आणि कां बांधला ह्या प्रश्नाची चर्चा किल्ल्यांच्या बाबतीत करणे म्हणजे थोडे हास्यास्पदच नाही का? पण सोलापूरच्या किल्ल्याच्या बाबतीत तसा विचार करावा लागेल. कारण, साधारणपणे किल्ले स्वसंरक्षण व शत्रूंची टेहेळणी करण्यासाठी उंच ठिकाणी बांधले जातात. इतरही काही कारणे असू शकतील परंतु वरील दोन कारणे ही मूलभूत कारणे म्हणून नमूद करण्यास हरकत नसावी. सोलापूरचा हा किल्ला टेहेळणीच्या दृष्टीने अगदी निकृष्ट दर्जाचा ठरावा. कारण किल्ला ज्या भूभागावर उभारला गेला आहे तो भूभाग सोलापूरच्या परिसरांतील इतर भूभागापेक्षा बराच खाली आहे. त्यामुळे शत्रूंच्या टेहेळणी करिता तो निकामी आहे. आता राहिला संरक्षणाचा प्रश्न तो मात्र हा किल्ला व्यवस्थित पार पाडीत असावा असे वाटते. किल्ल्याभोवती पूर्वी चांगला खंदक होता व त्यात शेजारच्या सिद्धेश्वर तलावातून खेळते पाणी सोडले जात असे. हा सिद्धेश्वर तलाव ह्या किल्ल्यापेक्षा प्राचीन आहे. त्याला तसा इतिहासही आहे. इतरही काही स्वसंरक्षणासाठी उपाययोजना होती व त्यापैकी आजही काही दिसतात.

किल्ला बांधण्यासाठी पूर्वी किल्ल्याच्या जागीच असलेल्या भव्य मल्लिकार्जून मंदिराला जमीनदोस्त करून त्याचे दगड, कोरीव खांब व सुंदर मूर्ति यांचा-अगदी मुक्तहस्ताने किल्ल्याच्या बांधकामात वापर केला गेला आहे. आसपासची इतर काही हिंदू मंदीरे ह्या तडाख्यातून सुटली गेली नसावीत.

अनुक्रमणिका






तश्या काही दंतकथाच काय पण पुरावेसुद्धा उपलब्ध आहेत. ह्यावर विस्ताराने लिहिता येण्यासारखे आहे. तो एक वेगळचाच विषयाचा लेख होईल. ह्यावरून एक गोष्ट मात्र स्वच्छपणे उघडकीस येते की कोणत्यातरी मुसलमान राजाने ही कामगिरी पार पडली असावी. हिंदु राजे हिंदूंचीच देवळे पाडून किल्लाच काय पण एकादी साधी धर्मशाळा सुद्धा बांधल्याचे उदाहरण नाही.

ज्ञात इतिहासानुसार हा किल्ला दीर्घकाळ अमूक एका सत्ताधीशाकडे होता असे सांगता येत नाही. काही दिवस अहमदनगरकरांकडे तर काही दिवस विजापूरकरांकडे असे नेहमी हस्तांतर होत असे. हे दोघे कधी एकमेकावर हल्ला करून किल्ला आपल्या ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न करीत तर कधीकधी आपसात विवाहसंबंध घडून आले म्हणजे एकमेकास हुंडा म्हणून हा सोलापूरचाच किल्ला देत असत. पुढे पेशव्यांनी हा किल्ला आपल्या ताब्यात घेतला व त्यानंतर आपणासर्वांस माहित असल्याप्रमाणे सन १८१८ साली इंग्रजांच्या ताब्यात गेला. आणि आता स्वातंत्र्यानंतर भारतीय पुराणवस्तू विभागाकडे आले. किल्ला उभा राहिल्यापासून सोलापुरास एक ऐतिहासिक किल्ला आहे ह्यापलिकडे इतिहासाने नोंद घ्यावी अशी एकही घटना ह्या किल्यासंबधात घडली नाही. नाही म्हणावयास ह्या किल्ल्यामध्ये औरंगजेब दक्षिणेत आला असता काही दिवस ह्याचा मुक्काम होता म्हणे. सैन्यास पाण्याचा योग्य पुरवठा न होऊ शकल्याने येथून पश्चिमेस २४ मैलावर असलेल्या बेगमपुरास आपला मुक्काम हलवीला. तेथे बारमाही वाहणारी भीमा नदी आहे तेथे तो चांगला ४-४॥ वर्षे होता असे म्हणतात.

तर अशा ह्या किल्ल्यामध्ये काही कोरीव शिलालेख आहेत. लेख कन्नड, फारशी, संस्कृत आणि मराठी अशा विविध लिपी व भाषांमधून आहेत. त्यापैकी फक्त मराठी लेखच येथे संपादित होत आहेत. इतर लेखांविषयी थोडक्यात माहिती येथे दिल्यास अस्थानी होणार नाही असे वाटते. किल्ल्यासारख्या अवाढव्य बांधकामात असलेल्या शिलालेखांची जागा नेमकी सांगणे हे थोडेसे कठीण आहे अनेक ग्रंथ व नियतकालिकातील ह्या लेखांचे उल्लेख पाहून मला ह्यापैकी काही लेख शोधून काढणे फार कठीण गेले. तरीपण ह्याठिकाणी होता होईल तो शिलालेखांची नेमकी जागा सांगण्याचा प्रयत्न करतो.

कन्नड लेख

किल्ल्यास दोन तट, तीन दरवाजे आणि अनेक बुरूज आहेत. पूर्वेकडील आतल्या तटाच्या बाहेरच्या बाजूस किंचित उत्तरेकडे एक बुरुज आहे, त्या बुरुजाच्या दक्षिणेकडे तटाच्या भिंतीत जमिनीपासून ८-१० फूट उचावर हा लेख आहे. लेख कन्नड लिपीत आणि खंडित स्वरूपात आहे. शिलालेखाचा

खालचा ⅔ भाग फुटून गेला आहे. फूटून वेगळा झालेल्या भागाचा शोधूनसुद्धा पत्ता लागला नाही. हा दान लेख असावा. त्यावर तशी चिन्हे आहेत. या लेखाचा प्रथम उल्लेख सोलापूर जिल्ह्याच्या गॅझेटिअरमध्ये आला आहे. त्या नंतर श्री. न. वि. जवकलकृत 'सोलापूर शहराचा इतिहास' ह्या ग्रंथात आला आहे. दोन्ही ठिकाणी लेखाचे वाचन दिलेले नाही. मला कन्नड लिपी अवगत नसल्याने मी त्याचे वाचन करू शकलो नाही. हा लेख सुरुवातीस सांगितलेल्या तथाकथित मल्लिकार्जून मंदिराशी संबंधित असावा.

## फारशी लेख

फारशी भाषेतील एकंदर पाच लेख उपलब्ध झाले आहेत १) किल्ल्याच्या दुसऱ्या दरवाजावर २) तिसऱ्या दरवाजावर ३) वर कन्नड लेख ज्या ठिकाणी आहे त्याच्या दक्षिणेस आतल्या तटास बाहेरच्या बाजूस एक बुरुज आहे. त्या बुरुजाच्या बाहेरच्या भिंतीत ४) किल्ल्यातील सर्वात उंच हनुमान बुरुजावर फरशीसारखे खाली घातले आहे. ह्या लेखाचा वरचा भाग फारशीत व खालचा भाग मराठीत आहे. आणि ५) पश्चिमेकडे ज्या ठिणाणी एक मोठे खिंडार पडले आहे त्याच्या दक्षिणेस आतल्या तटावर एक खिडकीवजा झरोका आहे. त्या ठिकाणी हिंदू मंदिराचे नक्षी युक्त दोन खांब आहेत. एक बांधकामात आहे व दुसरे निखळून तेथेच खाली लवंडलेले आहे. त्याखाली पडलेल्या खांबावर एक लेख आहे. क्रमांक १,२ व ४ गॅझेटिअरकारांनी आणि क्र. ५ सो. श. इ. कारानी उल्लेखिलेले आहेत. क्रमांक ३ चा मात्र येथे प्रथमच उल्लेख होत आहे. क्र. १ ते ४ उठावदार अक्षरात तर क्र. ५ खोल अक्षरात कोरली आहेत. गॅझेटिअरकार व सो. श. इ. कार सांगतात त्याप्रमाणे हे लेख दरवाजे बांधल्याचे, बुरुजाची दुरुस्ती किंवा नवीन बांधल्याचे उल्लेख असलेले आहेत.

## संस्कृत लेख

दुसऱ्या दरवाज्याजवळ उजवीकडील भिंतीत पुरुषभर उंचीवर एक नागरी लिपीतील लेख आहे. तो झिजून अगदी पुसट व निर्वाच्य झाला आहे. या शिला लेखाची लांबी रुंदी २' ३।।" × ५।" आहे. एकूण २।। ओळीचा लेख आहे. तो मूळचा कोठला हे सांगणे कठिणच आहे. अक्षराची जुनी वळणे आहेत. लेखातील जी अक्षरे मला वाचता आली ती अशी –

(शके) १३२७ ×××××× सरे
×××× प ×× स्विमो ×××
××××

अनुक्रमणिका

यावरून काही अर्थबोध होत नाही. बरे तो किल्ल्याशी संबधित आहे असे ठामपणे सुद्धा सांगणे कठिण आहे. हा लेख मराठी भाषेत नाही एवढे खास. शिलालेख वाचण्यात जे पटाईत आहेत. ते एकादे वेळी संपूर्ण जरी नसला तरी ह्यापेक्षा अधिक भाग वाचू शकतील ह्या लेखाचा उल्लेख येथे प्रथमच होत आहे.

१ ) सुलतान महंमद आदीलशहाचा शके १५७५ चा मराठी शिलालेख

हा शिलालेख किल्ल्याच्या आत ईशान्य बाजूस असलेल्या एका जुन्या चौकोनी विहिरीवर होता. सध्या ती विहीर बुजत चालली आहे. सदरील शिलालेख आता तिसऱ्या दरवाज्याजवळील मॅन्यूमेण्ट ॲटेण्डेटसच्या खोलीत आहे पुढे कोठे जाईल याची माहिती नाही. याचा प्रथम उल्लेख सोलापूर जिल्ह्याच्या गॅझेटिअर मध्ये आला आहे त्यानंतर सो. श. इ. ह्या ग्रंथात श्री. जक्कल यांनी याचा उल्लेख केला आहे आणि प्रथम त्यांनीच याचे वाचन दिले आहे. पण ती बऱ्याच ठिकाणी चुकीचा व अर्थाचा अनर्थ करणारा आहे. त्यांनी दिलेले वाचन नविन वाचन करण्यास उपयुक्त ठरते. त्यानंतर ह्याचा उल्लेख एका निराळ्या संदर्भात श्री. वि. म. कुलकर्णी यांनी दयानंद कॉलेजच्या १९५७-५८ च्या नियतकालिकात केला आहे. त्या ठिकाणी मात्र लेखाचा पाठ बऱ्याच अंशी शुद्ध उतरला आहे परंतु वर्णनात्मक व तांत्रिकपद्धतीने येथे हा शिलालेख प्रथमच प्रसिद्ध होत आहे.

लेखाची शिला काळी व घोटीव आहे. पूर्ण शिलेची लांबी १ फूट ११॥ इंच व रुंदी १ फूट ६.८ इंच आणि जाडी ४॥ इंच आहे. त्यावरील लेखाची लांबी १ फूट व रुंदी १ फूट ८ इंच आहे. लेख एकूण ११॥ ओळीचा आहे. अक्षरांवर मोडीप्रमाणे सलग शिरोरेषा आहेत. अक्षरांची कमी अधिक उंची अर्ध्या इंचापासून एक इंचापर्यंत आहे. एका ओळीत सरासरी २२-३० अक्षरे आहेत. लेख स्वच्छ सुवाच्य व सुंदर अक्षरात आहे. लेखाची लिपी नागरी व भाषा फारशी मिश्रित मराठी आहे. तत्कालिन मराठी भाषापद्धतीचा व लेखन-पद्धतीचा नमुना म्हणून लेखाचा अभ्यास उपयुक्त ठरावा.

लेखाचा काल पहिल्या तीन ओळीत आला आहे. शके १५७५ विजयनाम संवत्सर म्हणजे इ. स. १६५३. हा कालखंड लेखात उल्लेखिलेल्या विजापूरचा बादशहा सुलतान महंमद आदिलशहा ( १६२६-१६५६ ) याच्या कालखंडाशी बरोबर जुळतो.

लेखाच्या पाचव्या ओळीत सोलापूरचा निर्देश कोट संदलापूर असा आला आहे.

शिलालेखाच्या पहिल्या तीन ओळी गद्यात आहेत. कालनिर्देशासाठी गद्य वापरलेले आहे. त्यानंतर सर्व लेख म्हणजे तिसऱ्या ओळीतील शेवटच्या दोन शब्दांपासून अंतापर्यंत पद्यात आहे. ते पद्य लावणी छंदात गुंफले आहे. 'ना' या अक्षराच्या यमकाने प्रत्येक चरणाची अखेर होते. बारा ओळीच्या मूळ लेखात पोवाड्याचे तेरा चरण आढळून येतात. ते अगदी सुंदर व आलंकारिक भाषेत रचले आहेत. पद्याची रचना शुद्ध मराठीत नाही हे उघड आहे. त्यात फारशी शब्दांचा बराच उपयोग केला आहे.

लेखात ई, ख, ब, र ही अक्षरे मोडी लिपीप्रमाणे कोरली आहेत. च आणि ब ही अक्षरे जुन्या वळणाची आहेत. ब हे अक्षर सध्या प्रचलित असलेल्या ळ प्रमाणे कोरले आहे आणि ल व ळ मधील फरक दर्शविण्यासाठी ल अक्षरास खालील बाजूस अर्ध ल जोडला आहे. जसे लृ, लेखामध्ये 'आ' काराचे प्रमाण बरेच आहे.

हा लेख किल्ल्यातील बाळंतिणीच्या विहिरीजवळ असावा असे विधान सो. श. इ. कारांनी केला आहे. लेखातील सातव्या ओळीतील एक शब्दाचे वाचन 'बाळदान' असे करून त्यानी तसा अंदाज व्यक्त केला असावा, पण त्याचे वाचन 'हावालदार' असे आहे. वस्तुतः किल्ल्यातील बाळंतिणीची विहीर ही पूर्व बाजूस दोन तटाच्या मधे आहे. लेखाशी संबंधित असलेली ही विहीर चौकोनी व लहान आहे.

लेखाचा आशय व उद्देश केवळ विहीर बांधल्याची नोंद करणे एवढाच आहे. आणि तो सोप्या भाषेत आहे. त्यात एक दोन अधिकाऱ्यांची नावे आली आहेत. श्री. वि. म. कुलकर्णी यानी लेख शुद्ध करून प्रसिद्ध केला आहे. त्यांच्या वाचनात अगदी किरकोळ स्वरूपाच्या चुका झाल्या आहेत. त्यामुळे लेखाच्या अर्थास बाध येत नाही. म्हणून पाठभेद न दर्शविता मूळ लेख जसाच्या तसा खाली देत आहे. तत्कालीन मराठी भाषेच्या अभ्यासकांस तो उपयुक्त ठरावा.

पाठ*

१ ) शके १५७५ विजयनाम संवत्सरे आस्विममासे बहुले पंचमि स्येमवा[1]

२ ) र मृपसिरा[2] नक्षत्र वरियानयो । ० ॥ सुहर सन सालासन प्रसंनवा ० ।

---

* मूळ शिलालेखावरून

१ ) सोमवार २ ) मृगसिरा

अनुक्रमणिका

३ ) ल फ ध १७ माहे जिलकाद रोज आलत्फात दिने राजा शाहा
४ ) सुलतान माहामद आदलशाहा पादशाहाना : त्यावरि पूर्ण कृ
५ ) पा असे सुराना: कोट संदलापूर अपलब नगिना : बाळाकिलामधे (बु)
६ ) नियाद सोधुन केली रचना : माहमदखान पिरमाहामद जाबितखान ह्या
७ ) वालदार सुज्याणा: नजिक शाहाबुरुज वा दारुखाना तेथे नवि मा
८ ) हामद बाई बांधिली वापि चौकोना : दोनि तरफ सिडिकोटा सिहरा
९ ) त करून घेतले बहमाना: त्यासि सदा प्रसन्न आहे स्वामि रहिमाना: न
१० ) जि बाई म्हणउनि लिहिले सासाना : त्याचा पाणि वेत जुमले ज्याना : याला
११ ) माचे हावाले होता दळपतरा ० गाविदरा[३] ० सरनाईक वाडि-दौलत । ० ।।
१२ ) हा मदीना:

२ ) अली अदिलशाहा सुलतानाचा हनुमान बुरुजावरील लेख

हा शिलालेख किल्ल्यात दक्षिणेकडील उंच अशा हनुमान बुरुजावर खाली फरशीप्रमाणे घातले आहे. पण तो मुळचा तेथला नसावा, त्याचे तेथे केव्हातरी स्थानांतर झाले आहे. या लेखाचा उल्लेख प्रथम गॅझेटिअरमध्ये व नंतर सोलापूर शहराचा इतिहास या ग्रंथात आला आहे. वाचन फक्त दुसऱ्या ग्रंथात दिलेले आहे आणि तो बराच अशुद्ध उतरला आहे. प्रस्तुत लेखवर्णनासह येथे प्रथमच प्रसिद्ध होत आहे. ह्या शिलालेखाची लांबी रुंदी २′ ६॥″ × २′ ,४″ आहे. वरील १ फूट ८ इंच भागात फारशीत लेख आहे. त्याखाली ९ इंचात नागरीलिपीत मराठी भाषेत उठावदार ४॥ ओळीचा लेख आहे, उठावदार अक्षरात मराठी लेख अगदी तुरळक आढळतात. अक्षरांची उंची एक इंचापर्यंत आहे. शेवटच्या ओळीत किंचित उंची कमी झाली आहे. लेखाची शिला खालच्या बाजूस व मराठी लेखातील पहिल्या ओळीतील पहिले अक्षर फुटले आहे. तरी फारशी व मराठी दोन्ही लेख पूर्ण व उत्तम स्थितीत आहेत किल्ल्यात आढळणाऱ्या इतर मराठी लेखांप्रमाणेच ह्या लेखातील अक्षरांचे वळण आहे. अक्षरे सुंदर व वळणदार आहेत. लेख क्र. १ प्रमाणे हा लेखसुद्धा पोवाडा छंद प्रकारात गुंफला आहे. यात सुद्धा ‘ ना ’ या अक्षरांचे यमक जुळविले आहे.

३ ) गोविंद

म्हणून ह्या दोन्ही लेखाचा पद्यलेखक एकच असावा असे वाटते. यात एकंदर सहा चरण आहेत. लेखाच्या पहिल्या व दुसऱ्या ओळीत सोलापूरचा उल्लेख कोट सोनलापूर असा आला आहे. शिलालेखाच्या मराठी भागात तरी कालोल्लेख नाही. त्यावरील फारशी भागात आला असल्यास न कळे.

हा लेख राजा अली अदिलशाह सुलतान ( १६५७–१६७२ ) याच्या कारकिर्दीतला आहे. त्याचा एक अधिकारी जाबितखान गानी एका महालाची रचना ( उभारणी ) करून त्या ठिकाणी एक हौद बांधला ( कारंजे ? ) त्यानिमित्त हा लेख कोरला आहे. लेख क्र. १ मधील जाबितखान व ह्यात उल्लेखिला गेलेला जाबितखान ही व्यक्ति एकच असावी. लेखात उल्लेखिलेल्या महालाचा आता पत्ता लागत नाही. एके काळी किल्ल्यात तीनशे इमारती होत्या असे म्हणतात. आता फक्त ५।६ किरकोळ खोली वजा इमारती शिल्लक आहेत. महाल शोभेल अशी एकही इमारत उभी नाही.

स आणि ब ही अक्षरे मोडी लिपीप्रमाणे व ल हे अक्षर सध्याच्या ळ प्रमाणे कोरले आहे. तत्कालीन मराठी भाषेचा हा सुंदर व नमुना अभ्यासकास उपयुक्त ठरेल.

पाठ*

१ ) ( रा ) जा आली येदिलशाहा सुलताना : कोट सोनला
२ ) पुरासी रक्षे सुगना : तेथील नेघबा बाजी जाबित
३ ) खाना : केली अपरुब माहालाची रचना : मधे
४ ) पलग करून हउदखाना : नवी प्रती म्हणउन लीही
५ ) ले सासाना :

### ३ ) बुरूज बांधल्याचा शके १४६६ या शिलालेख

किल्ल्याच्या बाहेरच्या पूर्व बाजूच्या आंतल्या आग्नेय कोपऱ्यात एक कमान वजा झरोका आहे. त्याच्या एका बाजूस घोटीव काळ्या शिलेवर लेख आहे. त्याच्या बाजूस हत्तीची शृंखला असलेली एक शिल्पशिला भिंतीतच आहे. ह्या लेखाचा उल्लेख सोलापूर जिल्ह्याच्या गॅझेटिअर मध्ये व सो. श. इ. मध्ये आला आहे. वाचन फक्त सो. श. इ. या ग्रंथात दिलेला आहे. वर्णनासह येथे प्रथम प्रसिद्ध होत आहे.

या लेखाच्या शिलेची लांबी १ फूट ९॥ इंच व रुंदी २ फूट ३ इंच आणि जाडी ७॥ इंच आहे. त्यावरील लेखाची लांबी १ फूट ३॥ इंच, रुंदी १ फूट

* मूळ शिलालेखावरून

८ इंच अशी आहे. लेखाच्या एकंदर ९॥ ओळी आहेत. अक्षराची उंची सुरवातीस १॥। इंच आहे. त्यानंतर कमी कमी होत शेवटी ½ इंचापर्यंत कोरली आहेत. संपूर्ण लेखाभोवती एक चौकट कोरली आहे त्या चौकटीमुळे लेखास शोभा आली आहे. अक्षरे सुवाच्य, स्पष्ट व सुंदर कोरली आहेत. चौकटीच्या वरील बाजूस दोन ओळी बारीक अक्षरात कोरण्यात आल्या होत्या. नंतर त्यांतली काही अक्षरे खोडण्यात आली आहेत कारण कळत नाही आणि शिल्लक शब्दांवरून अर्थबोध होत नाही. लेख नागरी लिपी आणि मराठी व फारशी अशा मिश्र भाषेत आहे. लेखातील ज, र, ब ही अक्षरे जुन्या वळणाची आहेत. ई, ख. भ. स ही अक्षरे मोडी लिपीत कोरली आहेत. अक्षरावर मोडी प्रमाणे सलग शिरोरेषा आहेत. शिलालेखात चौथ्या ओळीपासून ९ व्या ओळीपर्यंत बुरुज बांधण्यास सुरवात केल्याचा व पूर्ण झाल्याचा काळ फारशी भाषेतून सुहर कालगणना पद्धतीत व शक कालगणनापद्धतीत मराठी भाषेतून नमूद केला आहे. त्यावरून हा बुरुज बांधण्यास जवळ जवळ दोन महिन्याचा काळ लागला असे दिसून येते. क्रोधी नाम संवत्सर शके १४६६ च्या आषाढ महिन्यात बुरुज पूर्ण बांधून झाला. शक व संवत्सराचा मेळ बरोबर जमतो. त्यावरून इ. स. १५४४ असा येतो.

लेख कोरण्याचा उद्देश बुरुज बांधल्याचा उल्लेख करणे एवढाच आहे. त्यात कोणत्याही राजवटीचा निर्देश नाही. फक्त वदखा याच्या करकिर्दीत बांधला असा उल्लेख आहे. तिसऱ्या ओळीत गोसावी असा शब्द आहे. पण त्यावरून स्पष्ट असा उलगडा होत नाही.

किल्ल्यात उपलब्ध झालेला आणि किल्ल्याशी संबंधित असलेला हा सर्वात जुना कालोल्लेखित शिलालेख होय. ह्यावरून सोलापुराचा हा किल्ला साधारणपणे इ. स. १५०० च्या पूर्वीचा आहे. असे निदान करण्यास हरकत नसावी. ह्याहून जुनालेख शके १३२७ चा आहे. ( किल्ल्याच्या दुसऱ्या दरवाजा-जवळील संस्कृत लेख ) तो बराच अस्पष्ट आहे व तो किल्ल्याशी संबंधित आहे असे ठामपणे सांगणे कठिण आहे.

पाठ*

१) बुर्ज कारकिर्द खादाये

२) वदखा वे अजम बर्गभी

३) न गोसावि बुर्जा ×[1] व व ब

---

* मूळ शिलालेखावरून

१) या ठिकाणी चीर पडल्यामुळे अक्षर नीट लागत नाही.

४) यीमानिर्बु मुदति १ महे २१
५) रोजाणी तेरीख १८ माहे सफ
६) र ईहदे खमसईन ता। छ १०
७) माहे रबीलाखर ईहदे खम
८) सैन मोर्तबु जाहाला शके १४६६
९) क्रोधी सवत्सरे आषाड मासे ते हा बु
१०) र्ज मोर्तबु जाहाला

चौकटीच्या वरच्या बाजूस असलेला उर्वरीत लेख-

१) ×××××  ×××××
२) ×× ×× स अद्यैनति रुमया कारणे घे
३) ××××

## ४) शाह आलमगीर राजा यांचा विक्रम संवत १५३५ चा मोडी लिपीतील शिलालेख

हा शिलालेख पूर्वेकडील आतल्या तटाच्या आतल्या बाजूस दारूखान्याच्या समोर जरासा डावीकडे आहे. असा सो. श. इ. कार आपल्या ग्रंथात उल्लेख करतात. सध्या तटाचा हा भाग पडलेला आहे. बराच शोध होऊन सुद्धा हा लेख मला सापडला नाही. ढासळलेल्या माती दगडाखाली हा लेख दबला गेला असावा. किल्ल्यातील सर्वच मराठी लेख एकत्र प्रसिद्ध होत असल्याकारणाने हा लेख मी प्रत्यक्ष न पहाता उपरोक्त ग्रंथात ज्याप्रमाणे वाचन व वर्णन आहे तसेच पुढे देत आहे. हा लेख मोडी लिपीत स्वच्छ असा असून त्याच्या पाच ओळी आहेत.

१) खैरहात शाह अलमगीर राजा म
२) नोहर खासजी गौड किलेदार किले सो
३) लापूर ह्याच्या अमलामधें ह्या तरफ
४) ची अलंगजकोट कचा होता तो पका के
५) ला सन २४ विक्रम संवत १५३५ ॥ ६ ॥

हा लेख विक्रम संवत १५३५ म्हणजे इ. स. १६८० मध्यें शाहा अलमगीर राजा राज्य करीत असता मनोहर खासजी गौड याच्या अमलात सोलापूर किल्ल्याचा पूर्वभाग ( ज्यास अलंगजकोट म्हणत असत ) जो कच्चा होता, तो पक्का केला.



अनुक्रमणिका

५ ) एक प्राचीन मराठी शिलालेख

हा लेख पश्चिमेकडील बाहेरच्या तटाच्या आतल्या बाजुस ( ज्या ठिकाणी तटास मोठे खिडार पडलेले आहे. त्याच्या उजव्या बाजुस ) म्हणजे पश्चिमोत्तर बाजूस, तटाला लागून १–२ पायऱ्या आहेत. त्या ठिकाणी भिंतीत आहे हा लेख एका खडबडीत शिलेवर आहे. त्याची लांबी १ फूट ८.७ इंच व रुंदी १ फूट २.५ इंच आहे. अक्षरांची उंची १॥ ते १।।। इंचापर्यंत आहे. एकूण पांच ओळीचा हा लेख आहे. पहिल्या ओळीतील संवत्सर निर्देशक अक्षरें फुटून नाश पावली आहेत. लेख नागरी लिपी व मराठी भाषेत आहे. शिलालेखातील र आणि च ह्या अक्षरांची वळणे निःसंशय प्राचीन आहेत. तिसऱ्या व चौथ्या ओळीत आलेल्या ' नमस्कारु ' हे शब्दाचे रूप यादव-कालीन आहे. लेखाच्या सुरवातीस असलेला लेखाचा कालनिर्देश दुर्दैवाने फुटून गेला आहे. त्यामुळे निश्चित असा आपण काल सांगू शकत नाही. ह्या लेखांपासून कोणत्या प्रकारची माहिती आपल्या पदरात पडत नाही. केवळ लेख प्राचीन मराठी भाषेत आहे म्हणून येथे देत आहे. या लेखाचा यापूर्वी कोठेच उल्लेख झालेला नाही. येथे प्रथमच प्रसिद्ध होत आहे.

पाठ *

१ ) ×××××× सर आषाड सु ११ सोम ××

२ ) म्है सुलेकार रायबरि दामोधर

३ ) पंडितांचा नमस्का

४ ) रु रामनाथा

५ ) १०००००००

काही लोकांच्या घरांच्या भिंतीवर लिहिलेले आपण पाहतो की ' या बसा नमस्कार ' किंवा ' रामराम पाव्हणं ' अशा प्रकारात मोडणारा हा लेख असावा असे वाटते. अथवा दामोधर पंडिताचा रामनाथास (प्रभुरामचंद्रास ? ) एक कोटिप्रणाम असाही अर्थ निघू शकतो.

किल्ल्याच्या पश्चिमेकडील बाहेरच्या तटाच्या बाहेरील बाजूस पश्चिम दक्षिण कोपऱ्यावर तटाच्या बाजूस एक सिंह हत्तीवर हल्ला करीत आहे असे शिल्प आहे. त्याच्या वरच्या बाजूस लेख आहे. पण तो अत्यंत निरुपद्रवी असल्याकारणाने येथे देण्याचे टाळले आहे. सोलापूर जिल्ह्याच्या गॅझेटिअरमध्ये

* मूळ लेखावरुन

किल्ल्यात आणखीन १।२ ठिकाणी नागरी लिपीतीच लेख असल्याचा उल्लेख आहे. मी त्यांचा कसून शोध घेतला आहे. अद्यापि त्यात यश आले नाही.

सोलापूरच्या या मध्ययुगीन किल्ल्यातील उपलब्ध सर्व मराठी लेख येथे प्रसिद्ध होत आहेत. ते सर्व महत्त्वाचे आहेत आणि इतिहासात त्यानें मौलिक भर पडणारी आहे अशातला भाग नाही. यापैकी एकादुसरा लेख अभ्यासकास उपयोगी पडल्यास माझ्या या लेखसंपादनाचा खटाटोप उपयोगी पडला असे मी समजेन. वास्तविक हे सर्व लेख एक दोन अपवाद वगळता पूर्वी कमी-अधिक, शुद्ध अशुद्ध प्रमाणात का होईना इतरत्र प्रसिद्ध झाले आहेत ह्या ठिकाणी केवळ वर्णनासह प्रसिद्धी होत आहे. त्याचे श्रेय मला पाहिजेच असे नाही. मागील ग्रंथ आता दुर्मिळ झाल्यामुळे ह्यांचा उपयोग होईल अशी आशा आहे.














प्रा. रंगनाथ कौलगुड

# पुराण वस्तु संशोधनाची नवी साधने

एका जमान्यात पुराण-वस्तु-संशोधकाला आपल्या कामासाठी कुदळ, फावडे आणि होमर किंवा कोणा पंडिताचा संदर्भग्रंथ या तीन गोष्टी पुरेशा वाटायच्या. त्यांच्या साह्यानेच Troy, Mycenae, Knossos आणि Pompeii या प्राचीन शहरांचा शोध लागला. पश्चिमेकडील अनेक अभिजात रोमांचक कथा या शहराच्या भोवती गुंफण्यात आल्या होत्या. ट्रायच्या हेलनला कोण विसरेल ? बरोबर एक शतकापूर्वी Heinrich Schliemann या संशोधकाने सिद्ध केले की ट्रॉय हे होमरच्या प्रतिभेने निर्माण केलेले काल्पनिक शहर नव्हते, तर ते खरेच अस्तित्वात होते.

पूर्वीच्या संशोधकापेक्षा आजचा संशोधक जास्त महत्त्वाकांक्षी आहे. केवळ इतिहासाचे ठोकळ बाह्यरेखांकन त्याचे समाधान करू शकत नाही. त्याला राजकीय इतिहासापेक्षा सांस्कृतिक इतिहासाबद्दल जास्त आस्था आहे. प्राचीन माणूस कसा होता ? त्याचे दैनंदिन जीवन कसे होते ? त्याची कला-निपुणता कशी होती ? त्याचे भटकणे कसे होते ? तो कशाचा, कोणाशी व्यापार करीत होता ? या सर्व प्रश्नांची उत्तरे शोधून, प्राचीन कालाचे जिवंत चित्र नजरेसमोर कसे उभारता येईल, ही त्याची तळमळ आहे.

म्हणूनच आज तो भौतिकशास्त्रज्ञ, रसायनज्ञ, इलेक्ट्रॉनीय तज्ज्ञ आणि गणकयंत्रतज्ज्ञ या सर्वांची मदत घेत आहे आणि त्यांनी बनविलेली अनेक अत्याधुनिक साधने व उपकरणे यांचा उपयोग तो आपल्या पुराणवस्तू संशोधनाच्या कार्यासाठी करीत आहे, या सुधारित तंत्रामुळे शास्त्राचे सामर्थ्य वाढले आहे आणि संशोधन, जितके सूक्ष्म, विश्वसनीय तितकेच द्रुतगती झाले आहे.

उदाहरणार्थ, Pennsylvania विद्यापीठाच्या भौतिक आणि पुराण-वस्तु शास्त्रज्ञांनी दक्षिण इटलीतील Sybaris नावाचे भूमीत गडप झालेले प्राचीन शहर शोधून काढले आहे. त्यासाठी त्यांनी भूशास्त्राची अद्यावत शोधक-यंत्रे वापरली.

हे शहर ग्रीक साम्राज्यात ख्रिस्तपूर्वी ७२० च्या सुमारास दक्षिण इटली मध्ये वसविण्यात आले होते. ख्रि. पू. सहाव्या शतकात त्याच्याइतके समृद्ध आणि मोठे दुसरे ग्रीक शहर नव्हते. ते गल्फ ऑफ टारेन्टोच्या सुपीक किनाऱ्यावर वसले होते. एका शतकाच्या आत त्याचे सामर्थ्य इतके वाढले की त्याने आसपासचा मोठा प्रदेश आपल्या वर्चस्वाखाली आणला. इतकेच नव्हे तर इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावर त्याची एक वसाहत स्थापिली गेली.

अनुक्रमणिका






चैनबाजी आणि सुखलोलुपता या बाबतीत या शहरवासियांना तोड नव्हती. ख्रि. पू. ९१० मध्ये Crotona नगरराज्याने त्याचा पराभव केला व नगर जाळून जमीनदोस्त केले. अशा रीतीने जवळजवळ २५०० वर्षांपूर्वी नागरिकांना त्याचा त्याग करणे भाग पडले. परंतु ख्याली खुशालीचा त्याचा लौकिक आजही तसाच आहे. Sabarite हा इंग्रजी शब्द तेच सांगतो.

नंतरच्या ग्रीक आणि रोमन काळात नगराची पुनर्रचना करण्याचे प्रयत्न झाले. परंतु ते व्यर्थ ठरले. प्राचीन नगर गेले ते गेलेच. पण जाता जाता "संशोधकानों ! मला शोधून काढा" असे आव्हान देऊन गेले.

Pennsylvania विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयाचे मुख्य निर्देशक Dr. Froelich Rainey यांनी १९६० मध्ये या संशोधनात लक्ष घातले. या विद्यापीठामध्ये पुराण वस्तु संशोधनासाठी कित्येक नवी उपकरणे आणि नव्या पद्धती शोधून काढल्या होत्या. डॉक्टरना वाटले की या नव्या साधनांची कार्यक्षमता तपासण्यासाठी या शहराचा शोध ही एक नामी संधी आहे. रूढ साधने एक शतक वापरूनही फारशी प्रगती झाली नव्हती. म्हणून विरोधमापक आणि चुंबकीय मापक ही सूक्ष्मग्राही इलेक्ट्रॉनीय शोधक यंत्रे वापरून पाहाण्याची त्यांना तीव्र इच्छा झाली.

ज्या प्रदेशात हे शहर वसले होते असा कयास होता, त्या प्रदेशात गेल्या २५ शतकात मोठ्या प्रमाणावर अनेक भौतिक बदल झाले होते. एका भूकंपाने तर जमीन १५ फूट तरी खचली असावी. त्यामुळे समुद्राचे पाणी आत शिरले. त्यावेळेपासून आजपावेतो जमिनीची पातळी अनेकवेळा वर खाली झाली आहे.

आज भूमीतील जल-पातळी पृष्ठभागाच्या केवळ ३ फूट खाली आहे. शहराचे अवशेष पृष्ठभागाच्या खाली १२ ते २० फुटाच्या दरम्यान असावेत असा अंदाज होता. उत्खननाने ते मिळावायचे म्हणजे नुसते त्रासाचे, खर्चाचे नव्हते तर त्यात खूप वेळ गेला असता. जवळजवळ अशक्यच म्हणानात ! त्यात पुन्हा ते कुठे करावयाचे हा एक प्रश्नच. कारण एकूण तपासणीखालचा प्रदेश चांगला ४० चौरस मैलाचा.

डॉक्टरांनी प्रथम प्रोटॉन चुंबकीय मापक वापरला. त्याचे कार्य असे: मातीची भांडी जास्त चुंबकशक्ती दाखवितात. दगडी कामे त्या मानाने कमी चुंबकशक्ती दाखवितात. म्हणून मापक मातीत गाडलेली भांडी आणि दगडी इमारतींचे अवशेष शोधून काढू शकतो.

मापकाने घेतलेल्या नोंदीचे पुढे विश्लेषण करावे लागते. ते काम किचकट आणि अवघड आहे. तेव्हा ते चांगल्या तज्ञांकडूनच व्हावे लागते. त्यांच्याकडून अर्थातच ते जलद पार पाडले जाते.

हा मापक फारसा उपयुक्त ठरला नाही त्याने नंतरच्या काळातील काही रोमन अवशेष शोधले. परंतु त्यामुळे एक दिलासा मिळाला. कारण ऐतिहासिक दाखल्याप्रमाणे Sabarite शहराच्या लगत नंतरच्या काळात एक रोमन वसाहत होती.

१९६७ मध्ये त्यांनी या मापकापेक्षा १०० पट शक्तिमान असा Cesium चुंबकीयमापक वापरला. त्यामुळे दहा एकर क्षेत्राची तपासणी करता आली. अशा रीतीने अखेरीस नेमकी जागा सापडली. शक्तिमान अशा भोके पाडणाऱ्या यंत्रांच्या साह्याने कौले आणि भांड्यांचे अवशेष गोळा केले गेले. जेव्हा अरुंद भुयारे खणली तेव्हा मोठमोठ्या इमारतींचे दगडी पाये आढळले. दक्षिणेला आणि उत्तरेला नदीची कोरडी पात्रे आढळली. यावरून शहर दोन नद्यांच्या-मध्ये वसले होते असे सिद्ध झाले.

डॉ. रॅनी यांचे हे तंत्र इतर संशोधकांनीही यशस्वीपणे वापरले आहे. उदाहरणार्थ Yale विद्यापीठाच्या Dr. Michael Coe यानी Olemec या जातीची उत्कृष्ट डोक्याची कवटी शोधन काढली आहे.

नव्या तंत्राचे हे यश इतके घवघवीत असून देखील कित्येक संशोधक ते वापरायला बुजतात. याचे कारण एकच की त्याना या तंत्रांचे, उपकरणांचे ज्ञान नाही. शंभर संशोधकांपैकी एखादाच असा निघतो की ज्याला भौतिक-शास्त्राचे पुरेसे ज्ञान आहे. अद्यावत उपकरणे वापरण्याची हौस आहे एवढे मात्र खरे की काही अगदी बुरशी आलेले कट्टर सनातनी संशोधक सुद्धा आता या नव्या साधनांच्याकड वळू लागले आहेत.

१९४९ मध्ये Williard F. Libby याने रेडिओ कार्बन डेटिंग ( कालनिर्णय ) पद्धत शोधून काढली. त्यामुळे प्राचीन संस्कृतीबद्दलचे आपले ज्ञान जास्त विश्वसनीय आणि सखोल झाले. पूर्वीचा समज असा होता की हिमयुग २०,००० वर्षापूर्वी होते. या पद्धतीने ते केवळ १०,००० वर्षापूर्वी होते असे सिद्ध झाले आहे. ख्रि. पू. ७००० वर्षे पॅलेस्टाईनमध्ये शहरांना दगडांच्या वेशी होत्या; ख्रि. पू. ५००० ते ६००० वर्षांच्या दरम्यान मेक्सिकोमध्ये शेती केली जात होती, ही माहिती या कालनिर्णय पद्धतीमुळे प्राप्त झाली.

याच्यापूर्वी सगळा मामला अंदाजाचा ! प्रत्यक्ष पुरावा काहीच नाही. कालनिर्णय पद्धतीने पुराणवस्तुशास्त्र एकदम भारदस्त बनले. त्याचे तंत्र असे. प्रत्येक सजीवामध्ये रेडिओ कार्बन १४ ठराविक प्रमाणात असतो. तो जीव मेल्यानंतर वातावरणाकडून होणारी त्याची भरपाई थांबते. म्हणून मृतावशेषा-तील कार्बन १४ चा अंश कमी कमी होऊ लागतो. ५७३० वर्षानंतर त्याचा

अर्धा भाग नष्ट पावतो, या हिशेबावरून तो सजीवी, केव्हा मृत झाला हे काढता येते.

संशोधनाच्या दृष्टीने कालनिर्णयाचे हे तंत्र जरी फार महत्त्वाचे असले तरी ते शंभर टक्के खात्रीचे आहे असे म्हणता यावयाचे नाही. कारण त्यामुळे काही घोटाळेही झाले आहेत. शीलायुग हे ३६७० वर्षांपूर्वी होते असे ही पद्धत म्हणते. उलट वृक्षवलय पद्धतीने ते ५०० ते ७०० वर्षे आणखी प्राचीन ठरते. शिवाय कालनिर्णय पद्धत वस्तूचा सेंद्रिय पदार्थाशी संपर्क आला असल्यास मात्र वापरता येते. एरवी नाही. पद्धतीची लंगडी बाजू ही होय. म्हणून संशोधकांना प्रत्यक्ष पुराव्याखेरीज परिस्थितीजन्य अप्रत्यक्ष पुरावे विचारात घ्यावे लागतात. जोपर्यंत कालनिर्णय असे घेतले जातात तोपर्यंत त्यात शंकेला जागा राहतेच.

म्हणून संशोधक कालनिर्णयाची सरळसोट पद्धत शोधू लागले. यासाठी Thermoluminescence चे तंत्र फार उपयुक्त ठरू लागले आहे. प्राचीन अवशेषात मातीच्या वस्तू असतातच म्हणून त्याचा अभ्यास करावाच लागतो. पूर्वी भांडी तयार करण्याच्या शैलीवरून कालनिर्णय होत असे. परंतु त्यात फक्त आधीची कोणती, नंतरची कोणती हेच सांगता येई. निश्चित काल सांगता येत नसे.

हे नवे तंत्र मातीतील युरेनियम आणि थोरियम या किरणोत्सारींच्या प्रमाणांवर अवलंबून आहे. जितका मातीच्या वस्तूचा नमुना प्राचीन तितके त्या किरणोत्सारींचे नष्ट होण्याचे प्रमाण जास्ती; म्हणून त्यात बंदिस्त झालेल्या इलेक्ट्रॉनचे प्रमाण जास्त तो नमुना भट्टीत तापविला म्हणजे हे बंदिस्त इलेक्ट्रॉन विशिष्ट प्रकाश देत बाहेर पडतात, या प्रकाशालाच Thermoluminescence म्हणतात. सूक्ष्मग्राही यंत्राने तो प्रकाश शोधला जातो. जितकी वस्तू प्राचीन तितका त्या वस्तूतून बाहेर पडलेला प्रकाश जास्त तेजस्वी. यावरून त्या वस्तूची प्राचीनता ठरविली जाते. ही मोजणी अनेक बाबतीत उपयुक्त ठरली आहे परंतु या मोजणीत किमानपक्षी ५ % तरी चूक राहतेच. या पद्धतीने विद्यापीठातील रसायनज्ञांनी Etruscan पुतळे म्हणून विकल्या जाणाऱ्या पुतळ्यांपैकी काही बनावट आहेत असे सिद्ध केले. शिवाय संग्रहालयातील एका स्त्रीचा पुतळा प्राचीन नसून तो केवळ शंभर वर्षांपूर्वीचा आहे असा धक्का देणारा शोध लावला. Diana, the Huntress हा पुतळाही १९ व्या शतकातलाच आहे असे दाखविले.

Vassar College च्या Dr. Curt Beck यांनी युरोपमधील अॅम्बरच्या खाणी शोधून काढण्यासाठी Infra-Red –Spectrometer

वापरला. त्यांनी असा निष्कर्ष काढला की ख्रि. पू. १५०० मध्ये ग्रीक लोक डेन्मार्कमध्ये खणून काढलेले बाल्टिक ॲम्बर वापरत होते. यावरून उत्तर युरोपात Aegean खलाशी व्यापार करत होते, यासंबंधीच्या लोककथा खऱ्या भासू लागतात.

Dr Edward V. Sayre आणि Dr. Ray W. Smith यांनी प्राचीन काचेवर संशोधन चालविले आहे. माणूस गेली २७०० वर्षे काच बनवीत आला आहे या दोघांनी जगभर फिरून प्राचीन काचेचे नमुने गोळा केले व ते अणुभट्टीत टाकले. काच अणुभट्टीतील न्यूट्रॉन कण शोषून घेते व त्यामुळे वेगळ्या प्रकारचे किरणोत्सारी समस्थानीये तयार होतात. त्यांचा अभ्यास करून काचेत वापरली गेलेली खनिज रसायने मोजता येतात. या तंत्राला न्यू ट्रॉन Activation Analysis म्हणतात. याचा वापर करून डॉ. स्मिथ यांनी अफगाणिस्थानात सापडलेली एक सुरई सीरियामध्ये ख्रि. पू. ३०० मध्ये बनविली होती असे सिद्ध केले.

१९६६ मध्ये डॉ. स्मिथनी करनाक येथील Aten च्या देवळाचे इतस्ततः फेकले गेलेले भग्नावशेष एकत्र आणून पुन्हा देवळाची रचना करण्याचा उपक्रम हाती घेतला. त्यासाठी लक्षावधी ताशीव दगड वेचून, तपासून घ्यावे लागले. या प्रचंड कामासाठी स्मिथने गणकयंत्र वापरले. हे देऊळ ३३ शतकांपूर्वी बांधलेले होते. देऊळ जुळविण्याचे काम संपलेले नाही. परंतु काही भाग रचून झाले आहेत. त्यावरील कलाकुसर देखणी आहे. या देवळाची जुळवणी केव्हा पूर्ण होईल ती होवो. त्या कामामध्ये गणकयंत्राचा वापर होतो आहे हे विज्ञानाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

समुद्राच्या तळाशी असलेले प्राचीन अवशेष गोळा करण्याचे काम अलीकडे म्हणजे वीस वर्षांपूर्वी सुरू झाले. या अवशेषात मुख्यतः बुडालेले जहाजांचा समावेश असतो. १९६० नंतर बुडयांना अति कार्यक्षम व सुरक्षित असे साधन मिळाले. त्यामुळे या संशोधनाने खरा जोर धरला.

या संशोधनातील आघाडीचा वीर म्हणजे Bass विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयाचा शास्त्रज्ञ Dr. George Bass त्याचा खास विषय 'काश्याच्या युगातील ग्रीस' होता. गेल्या दशकात तो सागरी संशोधनाकडे वळला. त्यासाठी त्याने अनेक नवी उपकरणे आणि साधने शोधून काढली. हे संशोधन केवळ नाविन्याच्या हौसेने केलेले नव्हते. तर त्यामुळे मध्य, कॅरेबियन आणि बाल्टिक समुद्रात जी जहाजे बुडाली होती त्यावरून जहाज बांधणी, नौका

निर्देशन. व्यापारी समुद्रमार्ग वगैरे विषयांवर निरनिराळ्या ऐतिहासिक काळातील भरपूर माहिती मिळाली.

डॉ. बास यांच्यामते सागरी अवशेष भूअवशेषांपेक्षा जास्त सुरक्षित आणि म्हणूनच जास्त उपयुक्त व विश्वसनीय असतात, शिवाय बुडालेले जहाज म्हणजे त्या काळाला पेटीत बंदिस्त करून ठेवण्यासारखे आहे. नंतर जहाजाचे अवशेष वर काढले तर ते त्या काळचा इतिहास घडाघड बोलून दाखवितात. असे भूसंशोधनात घडणे नाही. याला एकच एक अपवाद म्हणजे Pompeii शहर ते सबंध शहर एकदम भूमीत गडप झाले होते.

सागरी पुराणवस्तू संशोधनासाठी फार त्रास घ्यावा लागतो. तसेच त्यासाठी वेळ आणि पैसा भरपूर प्रमाणात खर्च करावा लागतो. डॉ. बासनी Asherah नावाची सहज वळविता येणारी पाणबुडी बनविली. तिच्यात अनेक विशेष सोयी आहेत. ती सलगपणे आठ तास पाण्यात राहु शकते. ती दोन माणसांना ६०० फूट खोल पाण्यात नेऊ शकते. तिचा वेग ४ ते ८ नॉट असतो. तिच्यातून शक्तिमान प्रकाशस्रोत टाकता येतो. शिवाय तिच्यात त्रिमिति छायाचित्रीकरणाची सोय आहे. अशा रीतीने सुसज्ज असलेली ही पाणबुडी संशोधनाच्या कार्यात महत्त्वाची भूमिका पार पाडत आहे.

ज्याना प्राचीन मूर्तिकलेची आवड आहे त्याना काश्याच्या मूर्ती फक्त बुडालेल्या जहाजांच्या अवशेषातूनच मिळतात. कारण इतरत्र असलेल्या मूर्ती केव्हाच वितळवून टाकल्या गेल्या आहेत.

डॉ. बासने चित्रध्वनी छायाचित्रक, चुंबकीय मापक, ध्वनिशोधक ( Sonar Detector ) याचा संयुक्त वापर चालू केला आहे. त्यामुळे १००० फूट खोल पाण्यात तपासणी करता येणे शक्य झाले आहे.

सागराच्या तळाशी असलेल्या या खजिन्यांच्याकडे चाच्यांचे आणि साहसी जलपटूंचे लक्ष गेले आहे. त्यामुळे अवशेष चोरले जातील किंवा त्यांची नासधूस होईल अशी रास्त भीती व्यक्त केली जात आहे. म्हणूनच डॉ. बास म्हणतात की, त्यांच्यावर मात करण्यासाठी आणि प्राचीन अवशेष वाचविण्यासाठी नव्या द्रुतगती आणि कार्यक्षम साधनांचा उपयोग करणे अत्यावश्यक आहे. नाहीपेक्षा प्राचीन इतिहासाची अनेक प्रकरणे दाखले आणि पुरावे यांच्या अभावी तशीच कोरी ठेवावी लागतील.



श्री. चंद्रहास जोशी

## एक परंपरागत भारतीय लोककला

# छायानाट्य

छायानाट्य ही एक अतिप्राचीन भारतीय लोककला आहे. आज जरी ती रसातळाला गेलेली असली, तरी परंपरेच्या पकडीमुळे अजूनही ती बऱ्याच अंशी टिकाव धरून आहे. या लोककलेमध्ये मनोरंजनाचा बराच मोठा भाग असून संगीत, नृत्य व नाट्य यांचे हाताळण्याजोगे तंत्र व संस्कारक्षम असा-धार्मिक- सांस्कृतिक आचाराचा फार मोठा भाग आहे. त्यामुळे निर्जीव वाटणाऱ्या कातडी बाहुल्यांच्या हालचालींतून व त्यांच्या पडद्यावर पडलेल्या छायांच्या लयबद्धतेतून सूत्रधार सूचक अशा रामायण-महाभारतादी कथाभागांचे जिवंत चित्रण सहजरीत्या करू शकतो. या कलेतील हे सामर्थ्य लक्षात घेऊन अलीकडे दर्पण अकादेमीसारख्या संस्था तिचे पुनरुज्जीवन करण्याच्या प्रयत्नात गुंतलेल्या आहेत.

### भारत हेच तिचे जन्मस्थान

छायानाट्याची जन्मभूमी भारत हेच आहे. असे अनेक विद्वान अभ्यासकांनी अनेक पुराव्यानिशी प्रतिपादले आहे. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात छायानाट्याचे प्रयोग भारतामध्ये होत असल्याचे उल्लेख सापडतात. तसेच महाभारत, थेरीगाथा व अशोकाचे चौथे शिलाशासन यांतूनही छायानाट्यासंबंधीची वर्णने आढळतात. महाभारतामध्ये त्याला 'रूपोपजीवनं' असे संबोधले आहे.[1] 'दूतांगदं' हे सर्वात जुने छायानाट्य असून त्याचा कर्ता सुभट हा आहे आणि अंगदशिष्टाई हा त्या नाट्याचा विषय आहे. ज्ञानेश्वरी व दासबोध या ग्रंथातूनही ईश्वर व सृष्टी यांवर छायानाट्याचे रूपक केलेले आढळते. एकूण छायानाट्याची ही भारतीय परंपरा फार जुनी असल्याचे दिसून येते. लोकानुरंजन हा छायानाट्याचा प्रमुख उद्देश असल्यामुळे ही कला एकेकाळी विशेष परिणतावस्थेला पोचलेली होती. तसेच तिचा प्रसारही भारताच्या सर्व भागांमधून झालेला होता.

---

१. लोकनाट्याची परंपरा, वि. कृ. जोशी.

तमिळनाडू, ओरिसा, आंध्र मलबार या प्रदेशांतून आजही छायानाटयाचा प्रभाव टिकून असलेला दिसतो. मात्र त्याला प्रदेशपरत्वे विविध नावे दिलेली आढळतात.[२] उदा. ओरिसामध्ये 'रावणछाया' तर तमिळनाडूमध्ये 'पवाकुत्तू' किंवा 'चक्ल गोम्बाई अट्ट' आणि आंध्रमध्ये 'थोलू बोमलपट्ट' अशी ही नावे आहेत. तथापि त्यांचे विषय मात्र सर्वत्र सारखेच असतात व ते म्हणजे रामायण महाभारतादी कथानके वा शिवजन्मोत्सव, इत्यादी.

## परंपरागत छायाबाहुली

छायानाटयासाठी लागणारी बाहुली हा कळसूत्री बाहुलीचाच एक प्रकार असतो. त्यामुळे ती गाय–वासरू, म्हैस, बकरा वा हरिण यांच्या कातड्यांपासून तयार करतात. हरणाच्या कातड्याच्या बाहुल्या पवित्र मानण्यात येतात. त्यांची उंची सर्वसाधारणपणे २ ते २½ फूट असते. तथापि प्रदेशपरत्वे त्यांच्या आकार–प्रकारात थोडीशी भिन्नता आढळते. उदा० आंध्रमधील बाहुल्या या आकाराने लहानात लहान १४ इंचांपासून तर मोठ्यात मोठ्या ५ फुटांपर्यंतही असतात. विशेषतः देवादिकांच्या अथवा नायक-नायिकांच्या बाहुल्या मोठ्या असून इतर सामान्य पात्रांच्या बाहुल्या लहान आकाराच्या असतात. आंध्रमधील या मोठ्या आकाराच्या बाहुल्या जगातील सर्वात मोठ्या बाहुल्या मानल्या जातात. या बाहुल्यांमध्ये कोठे कोठे पेंढा भरतात तर कोठे पेंढा न भरता कातड्याच्या तीन थरांच्या साह्यानेही त्या तयार करण्यात येतात. या बाहुल्यांचा आकार अतिशय सुबद्ध व परिणामकारक असतो. बाहुल्या तयार झाल्यावर त्यांना अडकविण्याच्या सोईसाठी भोके पाडतात; व नंतर कथानकातील त्या त्या पात्राच्या वर्णनानुसार त्या त्या बाहुलीची रंगभूषा व वेषभूषा करतात. जुन्या काळी स्त्री–पात्रे रूढीनुसार पिवळा, नारिंगी, तपकिरी इ० रंगांच्या एकजीव मिश्रणाने मोहकरीतीने रंगवीत असत. आणि पुरुष–पात्रे विशेषतः राम–कृष्ण इत्यादी गडद निळ्या रंगाने रंगवीत. मात्र सीतेच्या बाहुलीसाठी मलबारमध्ये सोनेरी रंगछटेचा वापर करण्याची पूर्वापारप्रथा आहे. आंध्रमधील बाहुल्या पारदर्शक रंगांचा सुमेळ साधलेल्या व वैचित्र्यपूर्ण असतात. या तोडीच्या बाहुल्या जगात फक्त चिनी बाहुल्याच असतात. परंपरागत ग्रीक बाहुल्या आंध्रप्रदेशीय बाहुल्यांप्रमाणे रंगांचा सुमेळ साधलेल्या रंगवीत असल्या, तरी त्यात फक्त पिवळा, काळा व तपकिरी या रंगछटांचाच मेळ साधलेला असतो.

---

२. मार्ग, जून १९६८.

या छायाबाहुल्या गाठी मारलेल्या दोऱ्यांनी खांदे, कोपर, गुडघा व कंबर या ठिकाणी सांधलेल्या असतात. त्यामुळे त्यांची सहजसुलभ हालचाल करणे सोपे जाते. स्त्री-पात्रांमध्ये ज्या दोन विशिष्ट नर्तिका बाहुल्या असतात त्यांची सांधेजोड मात्र थोड्या वेगळ्या प्रकारची व गुंतागुंतीची असते. त्यांची हालचालही दोन सूत्रधारांकडून करण्यात येते. त्यांना पायघोळ झगे घातलेले असून त्या अतिशय चपळ असतात. त्यामुळे त्यांच्या नृत्यातून अभिजात नृत्याच्या हालचाली दाखविता येतात. त्यांच्या या मोहक नृत्यामुळे पडद्यावर एकप्रकारचे स्वप्नील वातावरण निर्माण होते.

परंपरागत रंगमंच

छायानाट्यासाठी उभा करण्यात येणारा रंगमंच हा परंपरागत पद्धतीचा असतो. तो एखाद्या पेटीप्रमाणे लांबट असून तीन बाजूंनी तो बंदिस्त असतो. तसेच कोठेही खुल्या मैदानात सहज उभा करता येईल अशा स्वरूपाचा तो असतो. त्याची लांबी १० फूट, उंची २१ फूट व खोली ६ फूट असते समोर $1\frac{1}{2}$ फुटांचा एक पुढे झुकलेला पडदा असून त्यावर नाट्यप्रसंगाचे नाव वगैरे लिहिलेले असते. ज्या पडद्यावर छाया उठवावयाच्या असतात तो मुख्य पडदा दोन शुभ्र पांढऱ्या साड्या एकावर एक जोडन तयार केलेला असतो व तो ताडाच्या काट्यांनी ताणून लावतात. तसेच तो जमिनीपासून गुडघ्यापर्यंतच्या उंचीवर असून त्याच्या अवतीभवतीचा खुला भाग गोणपाटाने झाकून टाकतात. काही प्रदेशांत या पडद्याच्या मध्यभागी एक लाकडी उभा दांडा लावून पडद्याचे दोन भाग करण्यात येतात. त्यांपैकी उजवी बाजू राम-सीता, हनुमान या दैवी पात्रांसाठी व डावी बाजू रावण, राक्षसगणादी दुर्जनपात्रांसाठी उपयोगात आणतात. छायाबाहुल्या काट्याच्या साह्याने त्या पडद्यावर अडकवून ठेवतात व खेळातील प्रसंगानुसार त्यांची हालचाल करण्यासाठी त्यावेळी त्या अलग करतात. ही त्यांची हालचाल बांबू किंवा वेताच्या छड्यांच्या साह्याने करण्यात येते. यासाठी पडद्यामागे वेगळी माणसे असतात. मुख्य सूत्रधार मात्र पडद्यासमोर उभा राहून कथाकथन करतो व हातातील 'ढापी' म्हणजे ढोल बडवितो.

प्रकाशयोजना

छायानाट्यातील या पांढऱ्या रंगाच्या पडद्यामागे चिरा दिलेल्या एका बांबूला खालच्या बाजूला ४१ दिवे लावलेले असतात. या दिव्यांसाठी कोठे कोठे चिरा दिलेल्या नारळांचा उपयोग करण्याचीही रूढी दिसून येते. प्रकाशाठी कापसाच्या वातींचे गठ्ठे उपयोगात आणतात. हे गठ्ठे तेलात भिजवून मंदिरातून आणलेल्या दीपज्योतीवर पेटवितात व त्या ४१ दिव्यांतून ते ठेवतात. अशा

रीतीने प्रज्वलित होणाऱ्या प्रत्येक दिव्यामुळे एकामागून एक बाहुल्या प्रकाश-स्रोतात येऊ लागतात व त्या उजळून निघतात. सुरवातीला बाहुल्यांच्या या छाया बेढब दिसतात; परंतु नंतर प्रज्वलित झालेल्या सर्वच दिव्यांच्या ज्योतींतून फेकलेल्या प्रकाशकिरणांनी तेजाळलेल्या छाया हळूहळू योग्य व वेधक आकार घेऊ लागतात.

## छायानाट्याची प्रयोगपद्धती

छायानाट्याचे हे खेळ भारतात एक धार्मिक बाब म्हणून मानण्यात येते, त्यामुळे ते वसंतऋतूमध्ये सण-समारंभ प्रसंगी एखाद्या शिवालयाच्या शेजारी पटांगणात करण्यात येतात. ते सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत चालत असून विनामूल्य व सार्वजनिक स्वरूपाचे असतात.

या खेळाच्या प्रारंभी धार्मिक विधी करण्यात येतो. त्यासाठी प्रथम शिवालयाच्या गाभाऱ्यातून एक दीपज्योत ढोल व झांजांच्या आवाजात वाजत-गाजत रंगमंचाकडे आणण्यात येते. ही मिरवणूक मग संपूर्ण रंगमंचाभोवती तीन प्रदक्षिणा घालून पडद्यामागे येऊन थांबते. नंतर सूत्रधार त्या पवित्र दीपज्योतीवरून एकामागून एक अशा पडद्यामागील ४१ दिव्यांच्या वाती पेटवितो. त्याबरोबर छायाबाहुल्यांच्या छाया पडद्यावर दिसू लागतात. सर्वप्रथम मूषकारूढ श्री गणेश व त्यांच्या अवतीभवतीचा पशुपक्ष्यांचा समुदाय यांची छाया पडद्यावर उमटू लागते. ते एक प्रकारचे स्तब्ध नाट्य (Tableau) असते. यानंतर सूत्रधार खेळाला प्रारंभ करतो. तो प्रेक्षकांसमोर येऊन हाताने ढापी म्हणजे लहान ढोल वाजवितो आणि खेळातील पात्रांची ओळख करून देऊ लागतो. त्याप्रमाणे पडद्यामागील सूत्रे हलविणारा माणूस त्या वर्णनाला अनुसरून त्या त्या पात्राच्या बोलण्या–चालण्याची व सरकण्याची हालचाल करतो. यावेळी त्या पात्राखेरीज अन्य बाहुल्या स्तब्ध असतात. मुख्य पात्राची हालचाल करताना खेळातील माणूस स्वतः त्याच्या पायाखालील लाकडी फळीवर पदविन्यास करतो. त्यामुळे त्याच्या पायांतील घुंगरांचा आवाज होऊन बाहुलीच्या हालचाली जिवंत वाटू लागतात. त्याच्या नृत्यातील हे पदविन्यास कुचिपुडी नृत्यशैलीतून उचललेले असतात. ओरिसामधील रावणछाया खेळात वातावरणनिर्मितीसाठी या छायाबाहुल्यांच्या जोडीला वृक्ष, झोपड्या, आसने, इत्यादी वस्तूही दाखवितात. त्यांच्या या काळ्या छायांच्या हालचाली व त्यानुसार पुढे पुढे सरकणारे कथानक यांमुळे खेळ परिणामकारी वाटतो.

## छायानाट्याचे पुनरुज्जीवन

छायानाट्याचे पुनरुज्जीवन घडवून आणण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात कर्तव्यतत्पर असलेल्या दर्पण[३] अकादमी, अहमदाबाद या संस्थेने रंगमंचावर काही तांत्रिक बदल घडवून आणून रामायण-महाभारतादींच्या कथानकांवर पारंपरिक पद्धतीने छायानाट्याचे यशस्वी प्रयोग केले आहेत. हे बदल घडवून आणताना संस्थेने प्रथम प्रदीर्घ कथानकाऐवजी अल्पावधीत होणारी कथानके निवडली. नंतर त्याला अनुरूप अशी संवाद-योजना केली. तसेच संवादाला संगीताची साथ दिली; त्यामुळे त्यांच्या खेळाला चांगलाच रंग चढतो. रंगमंचावरील परिणामकारकतेत अधिक भर पडावी म्हणून पात्रांच्या हालचालींना ते अधिक महत्त्व देतात. तसेच युद्धप्रसंगी आरोळ्या मारणे, घोड्यांच्या टापांचा आवाज करणे, हवेतून बाण जात असताना त्याचा सूं सूं आवाज होणे, सीतास्वयंवराच्या वेळी शहनाईचा सूर देणे, लंकादहनाच्या समयी रसानुकूल प्रकाशझोताचे परिणाम साधणे, तसेच शंखनाद, पक्ष्यांचा कलरव इत्यादी बाबीही कटाक्षपूर्वक करण्यात येतात. या सर्व गोष्टींमुळे छायानाट्य अधिक सूचक व जिवंत वाटू लागते.

## परदेशातील छायानाट्य

सोळाव्या शतकात विजयनगरच्या साम्राज्यकाळी छायानाट्याच्या खेळासाठी 'रामायण रंगनाथन' हे छायानाट्य लिहिल्याचा उल्लेख सापडतो. याच छायानाट्याचा प्रसार पुढे अतिपूर्वेकडील इंडोनेशिया, जावा, मलाया, ब्रह्मदेश व चीन इत्यादी देशांत झाला. पुढे पुढे तर छायानाट्य हे तेथील लोकनाट्याचाच एक भाग बनून गेले. इंडोनेशियात छायानाट्याला 'वायांग कुलित' असे म्हणतात. त्याचे कथानक भारतीय कथांवरच आधारित असते. छायाबाहुल्यांची पद्धतही आंध्रप्रदेशातील छायाबाहुलीप्रमाणेच असते. त्यांचे गुंतागुंतीचे तक्षण केलेले असून त्या शृंगारलेल्या असतात. त्यामुळे 'वायांग कुलित' आकर्षक व मोठ्या शोभिवंत दिसतात. फरक एवढाच की आंध्रमधील 'थोलु बोमलट्ट' पारदर्शक, आकाराने मोठ्या, प्रेक्षणदृष्ट्या वैचित्र्यपूर्ण रंग असलेल्या व बांबू किंवा वेताच्या साह्याने हालचाल करणाऱ्या असतात, तर 'वायांग कुलित' या अपारदर्शक व आकाराने लहान असतात आणि त्यांची हालचाल म्हशीच्या शिंगांच्या साह्याने करण्यात येते. जावामध्येही छायाबाहुल्यांना रंग न देता त्या डाग देऊनच अलंकृत करण्यात येतात. ब्रह्मदेशातील 'यमप्वे' म्हणजे

---

३. मार्ग, जून १९६८.

अनुक्रमणिका

रामायणाच्या खेळात पडद्याचे विभाजन लाकडी दांड्याच्या साह्याने न करता प्रखर व मंद अशा झोताच्या साह्याने दाखवितात. तसेच पात्रांसाठी मुखवट्यांचा उपयोग करतात. त्या विभाजनाच्या उजव्या भागी देवादी पात्रे व डाव्या भागी राक्षसगण असतो.

चीनमध्ये हान राजवटीपासून छायानाट्याची परंपरा चालू आहे. या चिनी छायाबाहुल्यांची उंची कमी म्हणजे अवघी नऊ इंच असते. या जगातील अत्यंत प्राचीन छायाबाहुल्या मानल्या जातात. तथापि त्यांची चेहरेपट्टी मंगोलियन चेहरेपट्टीशी मुळीच जुळत नाही. उलट त्यांचे ते अश्वनासिकासदृश वा गोलवट आकाराचे नाक, मोठ्या आकाराचे डोळे, रेखीव बांधा व खेळाची पद्धत इत्यादींचे साधर्म्य इंडोनेशियातील छायाबाहुलीशी आढळून येते. त्यामुळे त्यांची पूर्वपीठिका भारतीयच आहे, असे अनुमान करावयाला हरकत नाही, असे अभ्यासकांचे मत आहे. बाहुल्यांची हालचाल मात्र बांबूने न करता लोखंडी दांड्याने वा तारेने करण्याची प्रथा आहे.

अतिपूर्वेकडील देशांप्रमाणेच ईजिप्त, अरबस्तान तुर्कस्तान, या देशांतही प्राचीनकाळी छायानाट्याचा बराच प्रसार झाला होता. तुर्कस्तानातूनच पुढे ते ग्रीसमध्ये गेले. तेथे मात्र त्याचे मूळरूप बदलून त्यात अश्लीलता व अवखळपणा आला. सतराव्या शतकात इटलीमध्ये छायानाट्याचे खेळ होऊ लागल्यावर त्याचा प्रसार इतर पाश्चात्य देशांत झाला व अठराव्या शतकात अमेरिकेत ते बरेच लोकप्रिय झाले. तेथील ब्रोकन ब्रीज हे १९ व्या शतकातील छायानाट्य तर जागतिक कीर्तीचे ठरले आहे. जर्मन कलाकार रेनिंगर याने छायानाट्याचे चित्रपटदेखील तयार केले आहेत.

## संदर्भ

१. लोकधर्मी नाट्यपरंपरा, श्याम परमार.
२. Puppetry today by Helen Binyon.
३. Puppetry by Alen Stockwell.



# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

(१) वैदिक संस्कृतीचा विकास ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) ३०·००

(२) भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड १२·००

(३) इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... १०·००

(४) क्रोचेचे सौंदर्यशास्त्र ( अनु. डॉ. रा. भा. पाटणकर ) ... १०·००

(५) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) १०·००

(६) पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास
( डॉ. सुमंत मुरंजन ) ... ... ... ८·००

(७) चार्वाक–इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ६·००

(८) मानवाचा आदर्श ... ... ... ... ६·००

(९) नवमानवतावाद ... ... ... ... ५·००

(१०) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... ... ५·००

(११) लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... ४·००

(१२) भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) ... ४·००

(१३) हिंदी साहित्यविचार ( प्रा. पॅरेलाल गोहेल ) ... .... ३·००

(१४) महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना
( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... ... २·००

(१५) वायुस्तुति ( माध्व ) समश्लोकी व तात्पर्यार्थासहित ... १·००

(१६) न्यायसार – आचार्य भासर्वज्ञप्रणीत मराठी भाषांतर व
अर्थबोधक टीपांसहित .... ... ५·००

(१७) श्री. यशवंतराव चव्हाण– अभिनंदनग्रंथ ... ... २०·००

मिळण्याचे ठिकाण– प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )